नेहरू बाल पुस्तकालय

# मुलांची नाटके

संपादक

**रत्नाकर मतकरी**

चित्रकार

**जोमराज**



एकः सूते सकलम्

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया



# नवं गोकुळ

## पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे

(सुरुवातीला तमाशाच्या थाटांत नमन होते.)

जय गणनायक सिद्धि–विनायक नमन तुला करितो देवा......
तूंच उजळिसी नभांत तारे
तूंच निर्मिसी चिंचा बोरें
आम्हि भटकतां गणितें अमुची गुपचुप तुम्ही करुनी ठेवा......
नैवद्याचे ताट ठेवुनी
आई बसतां डोळे मिटुनी
सोंडेने उचलुनिया मोदक हळूच हातावर द्यावा......
मुठींत या चिंचा असतांना
पुस्तक ते दिसुं दे बाबाना
हात लावितां पेन्सिल रब्बर जादूने पेढा व्हावा......
जमुनि बालिका आणिक बालक
आम्हि बसविले छोटें नाटक
हंशा आणखी टाळ्या यांचा समोर पाऊस पाडावा......
जय गणनायक सिद्धि–विनायक नमन तुला करितो देवा......

(नमन संपताच एक खेडवळ गृहस्थ प्रवेश करतो आणि सोंगाड्याच्या गळ्यांत जाऊन मिठी मारतो. सोंगाड्याचा पोशाख रंगीबेरंगी आहे. ह्या खेडवळ गृहस्थाचे नांव आहे माखुडशिंगे.)

**आखुडशिंगे** : वा वा ! भले भले ! शाबास शाबास ! या मंडळी ! नमनाचा थाट तर बेफाट झाला. कुठल्या गांवचे तुम्ही ?

**सोंगाड्या** : गांव ? आम्हांला गांवबिव कांही नाही. नुसतं नांवच आहे.

**आखुडशिंगे** : अहो असं कसं होईल ? ज्याला नांव आहे, त्याला गांव असलाच पाहिजे !

**सोंगाड्या** : असं का ? ती ऽऽ तिकडून वाहते आहे तिचं नांव काय ?

**आखुडशिंगे** : अहो ती नदी आहे.

**सोंगाड्या** : तिचं नांव काय ?

**आखुडशिंगे** : तिचं नांव चंपावती नदी !

**सोंगाड्या** : तिचं नांव चंपावती नदी; बरं तिचं गांव कुठलं ?

**आखुडशिंगे** : नदीचं गांव ? नदीला काय एकच गांव असतंय् काय ? खुळे की काय तुम्ही राव ?

**सोंगाड्या** : आता आवरा ! ज्याला नाव असतं त्याला गाव असायलाच पाहिजे म्हणालात ना तुम्ही ? त्या नदीला नाव आहे – गाव बोला !



आखुडशिंगे : चुकलं बुवा आमचं !

सोंगाड्या : मारा तोंडात

(आखुडशिंगे सोंगाड्याच्याच तोंडात मारतो.)

अहो, माझ्या काय तोंडात मारता ? तुमच्या तोंडात मारा.

आखुडशिंगे : तुमच्या ?

सोंगाड्या : तुमच्या तुमच्या !

आखुडशिंगे : मग तुमच्याच तोंडात मारली की मी !

सोंगाड्या : भले ! तुमच्या गावची रीत उलटीच दिसते. म्हणजे चुकायचं तुम्ही आणि मार खायचा आम्ही काय ? – वा ! काय नाव तुमच्या गावाचं ?

आखुडशिंगे : उलटेवाडी.

सोंगाड्या : मग बरोबर ! उलटेवाडीला लोक सुलटे कसे वागणार हो. तुमच्या गावात घरावर छप्पर घालतात की छपरावर घर ?



आखुडशिंगे : तो प्रश्नच नाही निघाला गावात.

सोंगाड्या : कां ?

आखुडशिंगे : कारण आमच्या गावात एक देखील घरवालं छप्पर नाही आणि एक देखील छप्परवालं घर नाही ! अहो ही उलटेवाडी आहे.

सोंगाड्या : पण गावात माणसंच राहतात ना ? का जनावरं ?

आखुडशिंगे : माणसं कुठली अन् जनावरं कुठली हे हुडकणं अवघड आहे आमच्या गावात.

सोंगाड्या : बरं ! काय – शाळाबिळा ?

आखुडशिंगे : फक्त धर्मशाळा !

सोंगाड्या : मग मुलं दिवसभर काय करतात ?

आखुडशिंगे : दंगा !

सोंगाड्या : अरे अरे अरे ! अरे मग तुमच्या मुलांना ज्ञान कसं मिळणार ?

आखुडशिंगे : ती पहा मुलं येताहेत त्यांनाच विचारा !

(दोन अत्यंत बावळट दिसणारी व घाणेरडे कपडे घातलेली मुले येतात. त्यांच्या तोंडावर चिखलाचे डाग आहेत. सदऱ्याला गुंड्या नाहीत. टोप्या कधी घुतलेल्या नाहीत. त्यांच्या मागून एक तसलीच मुलगी येते.)

सोंगाड्या : हं तुझं नाव काय रे ?

पवळ्या : पवळ्या !

सोंगाड्या : आणि तुझं रे ?

ढवळ्या : ढवळ्या !

सोंगाड्या : तुझं ग – अग इकडे ये, पळू नकोस, ये ये.

ढवळ्या : तिला तसं नाही कळणार. फिस्–फिस् फिस्–फिस्.

सोंगाड्या : अरे फिस्–फिस् फिस् फिस् काय ? ती काय मनी मांजरी आहे ?

पवळ्या : तिचं नाव मनी. ये मने, फिस् फिस् फिस्.

**मनी** : काय रे पवळ्या ?

**सोंगाड्या** : काय हो, ह्या मुलांना ही अशी काय नावं ठेवली आहेत ?

**आखुडशिंगे** : अहो उलटेवाडीत अशीच नावं ! माझं तर नाव आखुडशिंगे आहे.

**सोंगाड्या** : वा ! पवळ्या–ढवळ्या–आखुडशिंग्या – ही तर बैलांची नावं ! मग तुमच्या बैलांची नावं काय ?

**पवळ्या** : आमच्या बैलाचं नाव गणपतराव !

**ढवळ्या** : आणि आमच्या बैलाचं नाव सुंदरराव !

**मनी** : माझ्या म्हशीचं नाव मंदोदरी !

**सोंगाड्या** : वा ! बैलाचं नाव गणपतराव – सुंदरराव, म्हशीचं मंदोदरी ! मग रेड्याचं नाव काय ?

**ढवळ्या** : आमच्या रेड्याचं नाव साहेबराव !

**सोंगाड्या** : छान ! तुमच्या गावात कुंभार आहे का ?

**ढवळ्या** : हाय की मडक्या कुंभार !

**सोंगाड्या** : मडक्या कुंभाराच्या गाढवाचं काय नाव ?

**पवळ्या** : त्याच्या गाढवाचं नाव इंद्रसेन !

**सोंगाड्या** : मंडळी – मी तुम्हाला भेटायला आलोच नाही ! मला भेटायचंय, गणपतराव, सुंदरराव, इंद्रसेन, यांना – जा, आखुडशिंगे त्यांना बोलावून आणा –

**आखुडशिंगे** : कशाला ?

**सोंगाड्या** : त्यांच्याशी मला बोलायचं आहे ! जा – (आखुडशिंगे चार पायांनी चालणाऱ्या जनावरासारखा चालू लागतो.)

**सोंगाड्या** : काय हो ? असं काय चालता ?

**आखुडशिंगे** : अहो – दोन पायांनी चालत जाऊन कसं चालेल ? तुम्हांला हिशोब येतो ना ?

**सोंगाड्या** : येतो.





**आखुडशिंगे** : मग ऐका ! एका बैलाला भेटायला जायचं म्हणजे दोन पायांवर जाणं बरोबर – मग दोन बैलांना भेटायला किती पाय लागतील ?

**सोंगाड्या** : एका बैलाला दोन पाय – तर दोन बैलांना चार पाय ! बरोबर ! जा चार पायांवर ! हैक् हैक् हैक् ! (आखुडशिंगे चार पायांवर जातो) वाह वा रे उलटेवाडी.

**पवळ्या** : पाहुणे ! उलटेवाडीला नांवे ठेवू नका.

**सोंगाड्या** : मी कोण नांवे ठेवणार ? ज्यांनी कोणी तुमच्या गांवाला उलटेवाडी हे नांव ठेवलंय तो खरोखरीच चतुर असला पाहिजे.

**पवळ्या** : कोणी ठेवलंय ठाऊक आहे का तुम्हाला ?

**सोंगाड्या** : कुणी ?

**पवळ्या** : आयतोबाच्या देवळांत एक उलटेबुवा होते त्यांनी !

**सोंगाड्या** : तुमच्या देवळांतल्या देवाचं नांव आयतोबा ! अरे अरे अरे काय रे ही देवाच्या नांवाची विटंबना ! बरं शाळेत मास्तरनी काय शिकवलंय तुम्हांला ?




**ढवळ्या** : आम्ही मास्तरना शिकवतो !

**सोंगाड्या** : बरोबर ! उलटेवाडी नाही का तुमची ? तुम्हीच मास्तरना शिकवणार ! तूं काय शिकवलंय ग मने ?

**मनी** : चिमटे कसे काढावे !

**सोंगाड्या** : तूं रे ढवळ्या

**ढवळ्या** : गोट्या कशा खेळाव्या !

**सोंगाड्या** : तूं रे पवळ्या–

**पवळ्या** : मी मास्तरांची खुर्ची मोडायला शिकलो !

**सोंगाड्या** : उत्तम ! मग हल्ली मास्तर कुठे बसतात ?

**ढवळ्या** : आमच्या गांवांत मास्तरच यायला भितात.

**सोंगाड्या** : म्हणजे गांवाला मास्तरच नाहींत तुमच्या ?

**ढवळ्या** : नाहीं ! मास्तरांची खुर्ची मोडली मग मास्तर बसणार कुठे ?

**सोंगाड्या** : अरे खुर्ची मोडली तर सुताराकडनं दुरुस्त करून घ्यायची. सुतार आहे ना तुमच्या गांवात ?

**ढवळ्या** : हाय की नामा सुतार ! पण त्याच्या करवतीचे दांत पडले !

**सोंगाड्या** : करवतीचे दांत पडले ? कशामुळें ?

**ढवळ्या** : नामा सुतार सांगतो करवत म्हातारी झाली म्हणून तिचे दांत पडले.

**सोंगाड्या** : अस्सं ! बरं लोहार नाहे का ?

**पवळ्या** : आहे. दामा लोहार. त्याचा भाता उंदरांनीं कुरतडला.

**सोंगाड्या** : अस्सं ! – मग भाता शिवायला चांभार नाही ?

**ढवळ्या** : चांभार आहे – रामा चांभार, पण तो आहे तुरुंगांत !

**सोंगाड्या** : कां ?

**पवळ्या** : त्यानं गोमा वाण्याच्या साखरेच्या गोण्या चोरल्या !

**सोंगाड्या** : अस्सं ! मग गोमा वाणी काय करतो ?

**ढवळ्या** : गोमा वाणी गाणी म्हणतो !

**सोंगाड्या** : आणि दुकान बंद !

**पवळ्या** : दुकान बंद. नुसतीं दिवसभर गाणी म्हणतो ! आणि वेळ सांपडला तर चिंध्या फाडतो.

**सोंगाड्या** : चिंध्या कशाला फाडतों ?

**मनी** : मी सांगू ? – गोमा वाणी म्हणतो आभाळ फाटलंय त्याला ठिगळं जोडतों !

**सोंगाड्या** : अस्सं ! कसली गाणी म्हणतो गोमा वाणी ?

**ढवळ्या** : आम्ही म्हणू का ?

**सोंगाड्या** : म्हणा –

**पवळ्या** : अहो वाजंत्रीवाले – वाजवा हो वाजवा –

(तिन्ही मुले गाणें म्हणतात)

तड तड तड तड तड तड तड ताशा वाजला
थूइ थूइ थूइ थूइ शिंग म्हणालं

ढम ढम ढम ढम ढम ढम ढोल बोलला ऽ ऽ ऽ

वघायची उलटेवाडी का पाव्हनं . . .

बघायची उलटेवाडी

नदीला नसतंय पानी हो पाव्हनं – नदीला नसतंय पानी
दुधाला येत नाय लोनी हो पाव्हनं – दुधाला येत नाय लोनी
तेलाची मोडली घानी हो पाव्हनं – तेलाची मोडली घानी
चोरांनी घातली बेडी फौजदाराला – चोरांनी घातली बेडी

वघायची उलटेवाडी का पाव्हनं . . .

बघायची उलटेवाडी

गोठ्यांत नसतात गुरं हो पाव्हनं – गोठ्यांत नसतात गुरं
शाळेला जाइनात पोरं हो पाव्हनं – शाळेला जाइनात पोरं
शेताला जाइनात थोरं हो पाव्हनं – शेताला जाइनात थोरं
दादल्याला लाथा झाडी हो बायको – दादल्याला लाथा झाडी

बघायची उलटेवाडी का पाव्हनं . . .

वघायची उलटेवाडी

घाण खाऊन फुगली माशी हो पाव्हनं – खाऊन फुगली माशी
अन् पाटील राह्यला उपाशी हो पाव्हनं – पाटील राह्यला उपाशी
दळिद्रं बसलं उशाशी हो पाव्हनं – दळिद्रं बसलं उशाशी
अन् सावकार बांधतोय माडी दुमजली – सावकार बांधतोय माडी

वघायची उलटेवाडी हो पाव्हनं . . .

बघायची उलटेवाडी

**सोंगाड्या** : वा वा वा ! ! (आखुडशिंगे रांगत रांगत येऊन वा वा वा असे सोंगाड्या म्हणत असतांना त्याचे पाय धरतो) अरे बाप रे–

**आखुडशिंगे** : पाव्हणे – गणपतराव आले – सुंदरराव आले !

**सोंगाड्या** : अहो उभे राहा –

**आखुडशिंगे** : हात धरून उठवा ! कोणी तरी उठवल्याशिवाय आपल्या पायावर नाही उभं राहतां येत आम्हांला !

**सोंगाड्या** : मग पहिल्यांदा भेटलांत तेव्हा कसे दोन पायावर उभे होता ?

**आखुडशिंगे** : अहो तेव्हा गोठ्यांत बैलाच्या गळ्यात मिठी मारून झोपलो होतो. ते उठले त्यांच्याबरोबर मी आपोआप उभा राहिलो.

**सोंगाड्या** : गोठ्यांत झोपला होता ? का ?

**आखुडशिंगे** : घरांत उंदीर फार त्रास देतात. गेल्या महिन्यात ही बघा उंदरांनी माझी मिशी कुरतडली. आतां अर्धीच उरली. ही पण कुरतडली तर मग मला मिशी कोण आणून देणार हो ?

**सोंगाड्या** : खरं आहे ? कुठे आहेत तुमचे गणपतराव ? (आखुडशिंग्याला हाताला धरून उठवतो.) हं बोलवा.

**आखुडशिंगे** : अहो गणपतराऽऽव ! अहो सुंदरराऽऽव !
गणपतरावजी ऽऽ सुंदररावजी ऽऽ या ऽऽ

(गणपतराव आणि सुंदरराव हे दोन ' बैल ' येतात. अगदी खऱ्या बैलासारखं त्यांचं तोंड आहे, शेपट्या आहेत. पण चालतात मात्र दोनच पायांवर.)

**सोंगाड्या** : या ! रामराव !





गणपतराव }
सुंदरराव } : शंकर शंकर !!

**सोंगाड्या** : शंकर शंकर ! – तो गाढव कुठे गेला ?

**आखुडशिंगे** : मला गाढव म्हणता ?

**सोंगाड्या** : तुम्हाला गाढव म्हटलं तर गाढवाला राग येईल आखुडशिंगे – ते इंद्रसेन गाढव. त्याची तब्येत ठीक आहे ना ?

**आखुडशिंगे** : त्याचा आवाज बसलाय म्हणत होता. पालखी पाठवलीत तर येऊ असा निरोप आहे त्याचा !

**सोंगाड्या** : गाढवाला पालखी ? स्वतःला समजतो कोण तो ?

**आखुडशिंगे** : सर्वसत्यानाश पक्षाचा तो अध्यक्ष आहे !

**सोंगाड्या** : ठीक आहे, ए पवळ्या–ढवळ्या –जा, इंद्रसेन महाराजांना पालखीत घालून घेऊन या ! (मुले जातात) हं करूं काय गणपतराव ! काय सुंदरराव ?

**गणपतराव (बैल)** : आनंद आहे.

**सुंदरराव (बैल)** : ठीक आहे.

**सोंगाड्या** : हं – यंदा पीकपाणी कसं काय ?





**गणपतराव** : पीकपाणी ? (हसतो. त्याच्याबरोबर सुंदरराव हसतो.)

**सोंगाड्या** : काय हो ? हसायला काय झालं ?

(गणपतराव आणि सुंदरराव मोठमोठ्यानें हसतात. एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून हसतात.)

**सोंगाड्या** : अहो, नुसतं पीकपाणी कसं आहे म्हटल्यावर तुम्हांला एवढं हसायला काय झालं ? हं – आतां जास्ती हसलांत तर शेपटी पिरगाळीन हं !

**गणपतराव** : अहो रागावू नका पाव्हणे ! पीकपाण्याचा आणि आमचा संबंध काय ? आम्ही शेतावर गेलोंय कधी ?

**सोंगाड्या** : स्वतःला बैल म्हणून घ्यायला लाज नाहीं वाटत ? बैलाच्या जातीला खालीं मान घालायला लावलंत तुम्ही ! – शेतावर नाही तरी मोटेवर (दोघेहि माना हलवतात.) माना काय हलवताय नंदीबैलासारख्या ? बरं, गाडीला तरी जुंपलं होतं की नाही तुम्हांला – (बैल पुन्हा माना हलवतात.) अरे बैलोबा, बोलत कां नाही ? (दोघेही शेपटीनें डोळे पुसत रडायला लागतात) अरेच्या ! रडायला काय झालं ? उगी उगी – चांगले शिकलेसवरलेले बैल तुम्ही – रडता काय ? उगी उगी ! असं कुकूला गोऱ्हा असल्यासारखं रडणं शोभत नाही तुम्हांला, रडूं नका ! चूप ! ती बघ हम्मा आली – हम्मा आली – उगी उगी सुंदरराव, गणपतराव – काय झालं रे माझ्या बैलांनो ?

**सुंदरराव** : काय सांगू पाव्हणे ! आम्ही दोघे सख्खे चुलत-भाऊ आमचं घराणं फार जुनं – खानदानी.

**गणपतराव** : कात्रजच्या घाटांत – शिवाजीमहाराजानी शाहिस्तेखानाला फसवायला बैलांच्या शिंगाला मशाली बांधून सोडलं होतं ना ? त्यांत – सर्वात पुढे आमच्या घराण्यांतला बैल पळत होता.

पळतां पळतां मशालीनं शिंग जळालं, पण तो थांबला नाही ! त्या वेळी पुण्यांत त्या बैलाचा जाहीर सत्कार झाला होता !

**गणपतराव** : ही आमच्या शिंगावर काळी खूण आहे ना ?

**सोंगाड्या** : हो !

**गणपतराव** : ती त्या जळलेल्या शिंगाची खूण आहे. असं घरंदाज घराणं आमचं ! पण ह्या उलटेवाडींत नुसत्या शेपटीनं पाठीवरच्या माशा मारीत बसलोंय आम्ही. शेत नाही – गाडी नाहीं मोट नाहीं – तेलाची घाणीसुद्धा नाही ! रिकामं बसून बसून आमचं सगळं ज्ञान फुकट गेलं !

**सुंदरराव** : धान्याच्या मळणींत माझा पाय धरणारा दहा गांवांत बैल नाहीं–

**सोंगाड्या** : मग ह्या उलटेवाडींला कसे आलांत तुम्ही ?

**गणपतराव** : नशीव आमचं ! जानू पाटलाच्या पोरांचं लगीन झालं गेल्या वर्षी – तिरकेवाडीच्या पाटलाच्या पोरीशी. पाटलानं आपल्या जांवयाला आंदण म्हणून आम्हाला इथं धाडलं ?

**सोंगाड्या** : मग पाटलाचा पोरगा शेती नाही करीत ?

**सुंदररराव** : नाहीं हो ! तो मुंबईला गिरणींत गेला. पाटलांनी आम्हाला नंदीबैलवाल्याला विकायला काढलं होतं –

**सुंदरराव** : हो ! – अहो कष्टानं राबून – हक्काची पेंढी खाणारे आम्ही, आम्ही काय भिकेची पोळी खायची का ? तो नंदीबैलवाला जवळ आला तेव्हा मी जे मारलं शिंग त्याला –

**गणपतराव** : आणि मी दिली लाथ ठेऊन – (अभिनय करतो. ती आखुड-शिंग्याला लागते )

**आखुडशिंगे** : ओय ओय....ओय ओय –

**सुंदरराव** : तो नंदीबैलवाला पण असाच गेला !

**सोंगाड्या** : शाबास !

**गणपतराव** : पण पाहुणे, आता ह्या उलटेवाडीचा वीट आला. अहो इथं काही कामच नाही – चला आम्हाला तुमच्या गावाला घेऊन !

**सोंगाड्या** : जरूर या.

**आखुडशिंगे** : अहो, पण यांना गावच नाही –

**सोंगाड्या** : अहो जो अंगमेहनत करणारा असतो ना – तो ज्या कुठल्या गावात जाईल ते गाव त्याचं ! तुम्ही राबायला तयार आहात ना ?

**गणपतराव** : आम्ही चारी पायांवर राबायला तयार आहो !

**सोंगाड्या** : चला मी तुम्हाला काम देतो. अरे तुमच्यासारख्यांची गरज आज सगळ्यांना आहे ! आणखी कोणाला यायचं आहे आमच्या-बरोबर ?

(चिमण्यांसारखा पोशाख केलेल्या व चोंची लावलेल्या पाच–सहा मुली धावत येतात.)

**चिमण्या** : चिव चिव चिव चिव चिव
चिव चिव चिव चिव चिव
चिव चिव चिव चिव चिव चिऊऽऽऽ

(इथून पुढला संवाद छंदात म्हणायचा.)

**चिमण्या** : माझं नाव चिऊताई
माझं नाव चिऊताई
पाहुणे पाहुणे तुमच्या संगे
गावाला तुमच्या घेऊन जा
उलटेवाडीत धान्यच नाय मेलं धान्यच नाय
चिऊताई चिऊताई खाईल काय ?

(दोन हिरवे पंख लावून पोपटासारखा तांबड्या पट्टीचा मुखवटा लावलेले मुलगे येतात.)

**पोपट** : रामराम रामराम
जयजयराम जयजयराम.

**सोंगाड्या** : तुम्ही रे कोण ?

**एक पोपट :** माझं नाव तोताराम.

**दुसरा पोपट** : माझं नाव बाताराम.

**दोन्ही पोपट** : तुमच्या संगे आम्हाला न्या.
पिवळा पेरू खायला द्या
हिरवी मिरची चावायला द्या
थोडासा हर्भरा भिजवून द्या
वाटीभर पाणी प्यायला द्या.

**सोंगाड्या** : काय रे पोपट
पक्के चावट
तुम्हाला कसलं येतंय काम ?
तोताराम बाताराम

**पोपट** : जयराम जयराम
जयजयराम जयजयराम
भजनानं आमच्या शेतकरी राजा
कामानं थकता होईल ताजा !

**कावळा** : (प्रवेश करीत)
काव काव काव काव
काव काव काव काव
पाहुणेदादा आम्हाला नेता ?

**सोंगाड्या** : कावळेदादा; तुम्ही पण येता ?

**कावळा :** येऊ नको दादा तर करू तरी काय ?
उलटेवाडीला काय पण नाय !
पहाटेला म्हणतो मी काका काका
उठा उठा उठा चला शेतावर जा
उठा उठा पोरांनो शाळेत जा

कुणी कुणी कुणी माझं ऐकत नाय
असल्या गावात मी करू तरी काय ?

**कोकिळा** : कुहु कुहु कुहु
कुहु कुहु कुहु

**सोंगाड्या** : पाहुं पाहुं पाहुं पाहुं — कोण आलं पाहुं ?

**कोकिळा** : (ताल बदलून)
माझं नाव कोकिळा
गोड माझा गळा
आंब्याच्या पानामागे
बसते मी दडून
सगळ्यांना सांगते मी
गोड गळा काढून
अहो वसंत आला बघा
वसंत आला
फुलाची शोभा कुणि पहातच नाय दादा पहातच नाय
असल्या ह्या गावात मी गाऊ तरी काय ?

**सोंगाड्या** : चला चला चला
माझ्या संगे चला
गावाला चला माझ्या गावाला चला
तिथं छान छान शाळा
तिथं हिरवा हिरवा मळा
तिथं घेऊन कोयता विळा

शेतीवाडीत राबतात माणसं
तिथं मक्याची डुलतात कणसं
तिथं धान्याच्या पडल्या राशी
चिऊताईची पंगत खाशी
तिथं आंब्याची राई,

त्यांत कोकिळा गाई,
गाणी सकाळ–दुपार
तिथं आनंद अपार

नका गमावू रे वेळ
संधी सोन्याची टळेल
जो हजीर तो वजीर झाला

चला गावाला चला आमच्या गावाला चला.

**आखुडशिंगे** : अहो मिठू मिठू मिठू
अग कुहू कुहू कुहू
अहो चिऊ चिऊ चिऊ
अहो काऊ काऊ काऊ
नका जाऊं नका जाऊं नका जाऊं.

**कोकिळा** : तुमच्या ह्या गावात राहील कोण ?

**आखुडशिंगे** : कुहु कुहु गाणं आता गाइल कोण ?

**सुंदरराव** : तुमच्या ह्या गावात आहे का काही ?

**गणपतराव** : फुकटचं गिळायला भिकारी नाही.

(सर्व जण 'आम्ही भिकारी नाही – भिकारी नाही – आम्ही भिकारी नाही' म्हणत जातात.)

**आखुडशिंगे** : अहो पाव्हणे, अहो गावातून बैल गेले, चिमण्या गेल्या, कावळा गेला, पोपट गेला – सगळे गेले ! अहो आता आमच्या गावात राहणार कोण हो ?

(गाढवाचे ओरडणे ऐकू येते.)

**सोंगाड्या** : सत्य आहे ! तुमच्या गावात राहायला हा एकच प्राणी लायक आहे !

(पवळ्या आणि ढवळ्या इंद्रसेन गाढवाला पालखीतून घेऊन येतात.)

**सोंगाड्या** : नमस्कार गाढवमहाराज !

**गाढव** : माझं नाव इंद्रसेन ! कशाला बोलावलंत मला ? चांगला उकिरड्यावर विचार करीत पडलो होतो. आमच्या गावासारखा उकिरडा जगात नाही मिळणार ! उलटेवाडी म्हणजे गाढवांचं नंदनवन आहे.

**सोंगाड्या** : काय म्हणता ?

**गाढव** : विश्वास बसत नसेल तर बंड्या डुकराला विचारा. तो पाहा पलीकडच्या चिखलात लोळतोय तो – दहा गावचं सांडपाणी प्यालेला डुक्कर आहे तो ! साधासुधा डुक्कर नाही ! मोठ्या मोठ्या शहरातली गटारं पालथी घातली आहेत त्यानं ! डासबाबूंना ओळखता का ?

**सोंगाड्या** : डासबाबू ?

**गाढव** : हो हो – मच्छरकुमार डास ! फार विद्वान आहेत ते ! विलायतेला जाऊन मलेरियाची परीक्षा पास झाले आहेत. मी मी म्हणणाऱ्यांना हुडहुडी भरते त्यांच्याशी तोंड देताना. शिवाय आमच्या सर्वसत्यानाश पक्षाचे एक पदाधिकारी नारूअण्णा पायतोडे – बापरे – भल्या भल्यांचे पाय मोडून ठेवले आहेत त्यांनी – त्याशिवाय पंडित मत्कुणाचार्य–

**सोंगाड्या** : म्हणजे ढेकूण ? शीशी –

**गाढव** : शीशी ? तोंड आवरून बोला ! आमच्या गावचे ढेकूण म्हणजे काय समजला तुम्ही ? बडेबडे शेठजी, सावकार, राजेमहाराजे यांचं रक्त खेळतंय त्यांच्या अंगातून. आमच्या सर्वसत्यानाश पक्षाचं हे कार्यकारी मंडळ आहे ! कोणाची ताकद नाही आमच्या पुढे यायची !

**सोंगाड्या** : काय म्हणता ? ठीक आहे. तुमच्या पक्षाशी युद्ध करायला आमची फौज येईल – तयार रहा वाजवारे वाजवा ऽऽऽ.

(वाद्ये वाजतात. सुंदर गणवेश केलेली मुलांची व मुलींची एक तुकडी येते. काही मुलांच्या हातात डी. डी. टी. चे फवारे आहेत. त्यांच्या मागल्या रांगेतल्या मुलांच्या हातात फावडी व घमेली आहेत. त्यामागून पाट्या व पेन्सिली घेऊन काही मुले व मुली गाणे म्हणत येतात. आणि सैनिकांच्या संचलनासारखी शिस्तीत चालतात.)

नव्या युगाची नव्या जगाची
सेना अमुची छान
अज्ञानाची करूनी टाकू आम्ही दाणादाण !

(मातून पोपट, कोकिळा, चिमणी व कावळा येतात.)

या या या या स्वागत करू या नवीन सेनेचे
तेज आगळे पहा तयांच्या
मुखावरी नाचे !

**आखुडशिंगे** : पाहुणे, ही कुठली फौज ?

**सोंगाड्या** : ही आमच्या गावची ! ही पहिली तुकडी –

**आखुडशिंगे** : ह्याच्या हातात ह्या छोट्या तोफा कसल्या ? आमच्यावर नाही ना डागणार ?

**सोंगाड्या** : घाबरू नका ! ह्यांचे डासबाबू आणि ढेकूणराव आहेत ना त्यांच्यासाठी ही तयारी ! चला रे एक दोन तीन चार.

(मुले त्या तालात फवारे उडवीत जातात.)

**आखुडशिंगे** : आणि ही मुलं फावडी आणि घमेली घेऊन काय करणार ?

**सोंगाड्या** : तुमच्या बंड्या डुकराला आवडणारा चिखल आहे ना ? तो उपसणार –

**गाढव** : आमच्या डुकराचं चिखल संस्थान आहे –

**सोंगाड्या** : तें संस्थान आतां खालसा ! (घमेलीवाली मुले जातात.)

**गाढव** : पण बंड्या डुक्कर कुठें जाणार ?

**सोंगाड्या** : उलटेवाडीबाहेर ! डुकराची जागा गांवांत नाही ! –ही मुलं पाहिलींत ?

**गाढव** : हीं पाट्या–पेन्सिलवाली ?

**सोंगाड्या** : ही तुमच्यासाठी !

**गाढव** : त्यांची मला भीती नाही ! पाट्या–पेन्सिलीचं मला काय भय ?

**सोंगाड्या** : अहो, गांवांत पाटी–पेन्सिल आली की गाढवपणा ऽऽ

**पाट्या–पेन्सिलवाली मुलें** : गेलाच पाहिजे !

**सोंगाड्या** : ए पवळ्या, ए ढवळ्या, तुमच्या दोस्तांना बोलवा. हीं मुलं तुम्हांला छान छान गोष्टी सांगतील, गाणी म्हणतील – चला.

(पवळ्या–ढवळ्या, चिऊताई–कोकिळा व इतर पक्षी आगगाडी करतात. सर्वात शेवटीं दोन पोपट व सर्वात पुढे कावळा.)

कशासाठी पाटीसाठी
पेन्सिलसाठी बुकासाठी
छान छान गाण्यासाठी
काऊ चिऊ आल्या
गोडगोड खाण्यासाठीं मिठुमियाँ चला
झुकझुक गाडी आली
कोकिळेनें शिटी दिली
कू कू कू ऽऽ
काव काव कावळेबुवा
जल्दी जल्दी इंजर लावा
तोताराम हिरवा हिरवा
बावटा आत लावा
कशी चाले नवी गाडी
आनंदाच्या गांवा
कशासाठी पाटीसाठी – –

**सोंगाड्या** : पहा आखुडशिंगे ! मुलांच्या हातांत पाट्या आल्याबरोबर सगळीं पांखरं परत आली तुमच्या गांवाला ! आतां राहिले सुंदरराव आणि गणपतराव. ह्यांना शेतावर नेतां की नेऊं आमच्या गांवाला ?

**सुंदरराव** : नको नको ! यांनी आम्हाला शेतावर नाही नेलं तर आम्ही यांना शिंग मारून शेतावर नेऊं –

**गणपतराव** : तें आमच्याकडे लागलं. अहो आतां ही पोरे शाळेला जातील – – शिकून शिकून भूक लागेल त्यांना – मग मागतील भाकरी ! आम्ही जर शेतांत गेलोंच नाही तर बाजरी कशी पिकणार ? बाजरी नाहीं तर भाकरी कुठली ? भाकरी नाही तर पोरं उपाशी ! आणि ज्या गांवचीं पोरं उपाशी त्या गांवांत त्यांना उपाशी टाकून खाणाराचं कधी कधी भलं होणार नाही !

**आखुडशिंगे** : कशावरून !

**गणपतराव** : मी कोण आहे ?

**आखुडशिंगे** : बैल !

**गणपतराव** : माझी आई कोण ?

**आखुडशिंगे** : गाय !

**गणपतराव** : गाईच्या पोटांत देव किती ?

**आखुडशिंगे** : तेतीस कोटी !

**गणपतराव** : माझा जन्म ज्या आईच्या पोटीं झाला तिच्या पोटांत तेतीस कोटी देव आहेत. म्हणजे मला तेतीस कोटी देवांचे बळ आहे – मग बैलाचा शब्द होईल का खोटा !

**आखुडशिंगे** : नाहीं.

**गणपतराव** : मग करा कामाची घाई – का हाणुं शिंग ?

**आखुडशिंगे** : नको नको – करतों !

**सुंदरराव** : चला शेतावर.

**आखुडशिंगे** : चलतो.

**सुंदरराव** : धरा नांगर !

**आखुडशिंगे** : धरतों (त्या दोघांच्या गळयांत हात घालून) अरे वा र माझ्या बैला ऽऽऽ र ऽऽ हैक् हैक्, व्हा पुढं. (बैल जातात.) पण पाहुणे, हे विद्वान राहिले यांचं कसं ? ह्यांच्या सत्यानाश पक्षाचं काय ?

**गाढव** : मी माझा पक्ष सोडला !

**सोंगाड्या** : मग तावडतोब जा ! कुंभाराला म्हणावं मडकी घडवायला घे ! पोरं शाळेला गेली, त्याना तहान लागेल. पाणी पाहिजे. पाणी आणायला मडकी माहिजेत !

**गाढव** : आतां जाऊन कुंभाराला लाथ मारून उठवतो !

**सोंगाड्या** : हां हां लाथ–बीथ नका मारूं –

**गाढव** : पण आमची ही वाडवडलार्जित पद्धत आहे !

**सोंगाड्या** : ती विसरा आतां–

**गाढव** : पण तो मुलखाचा आळशी कुंभार – तो उठणार कसा ?

**आखुडशिंगे** : मी सांगू ? तुमच्या गोड आवाजांत भूपाळी म्हणा –

**गाढव** : (त्याच्यापुढें ओरडतो) हाँ ऽ क् हाँ ऽ क्–

**आखुडशिंगे** : अहो, माझ्यापुढे नव्हे – कुंभारापुढे !

**गाढव** : बरोबर – तुमच्यापुढें गाऊन काय उपयोग ? काय गाढव हो मी तरी !

**सोंगाड्या** : अहो, तुम्हीच नाहीं, उलटेवाडीतलं सगळे लोक !

(हाँक् हाँक् हाँक् ओरडत गाढव जातो)

**आखुडशिंगे** : पाहुणे, तुमची करामत मोठी ! तुम्ही पोरांना शाळेत धाडल्या-

बरोबर थोरं शेतांत गेली. पांखरं गांवांत आली. डुकरं बाहेर गेली. वा वा ! तुम्हीं सगळं बदललं – आतां गांवाचं नांव बदला – उलटेवाडीचे लोक सुलटे झाले – मग गांवाचं नांव काय ठेवता !

**सोंगाड्या** : गांवाचं नांव ? थांबा, आमची फौज आली. (मुलें येतात) काय रे ?

**एक तुकडी** : डास, ढेकूण, पिसवा, चिलटं – सगळीं खलास !

**दुसरी तुकडी** : गांवांतली घाण साफ सरली !

**तिसरी तुकडी** : गांवांतली शाळा मुलांनी भरली !

**सोंगाड्या** : शाबास ! आतां उलटेवाडीचं नांव काय ठेवायचं ?

. . . नवं गोकुळ !

(सर्व मुले पांखरे, बैल, गाढव परत जमतात आणि नव्या गोकुळाचें गाणें म्हणतात.)



(या नाटकाचा प्रयोग करण्यापूर्वी 'पुणे विद्यार्थी-गृह-पुणे-३०' यांच्याकडे ५ रु. मनिऑर्डरने पाठवून, त्यांची परवानगी घेणे आवश्यक आहे.)



# सकाळचा अभ्यास

## राम गणेश गडकरी

(दामू कोशातून शब्द काढीत आहे; एका बाजूस दिनू भूगोल घोकीत आहे, प्रत्येकाजवळ पुस्तके व वह्या पडल्या आहेत, जवळच कपडे पडले आहेत )

**दामू** : (डिक्शनरीत पाहतो) एफ. ए. बी. एल. ई, एफ ए –

**दिनू** : (मोठ्याने) खानदेश जिल्ह्यातील तालुके (तीनदा घोकतो) धुळे, अमळनेर, एरंडोल, पाचोरे – धुळे, अमळनेर एरंडोल.

**दामू** : एफ. ए. बी. एल. ई फेबल म्हणजे कल्पित गोष्ट (लिहू लागतो.)

**दिनू** : धु – ळे, अमळनेर –

**दामू** : दिन्या, हळू घोक ना रे ! माझा शब्द चुकला की इकडे ! हे बघ, फेबल म्हणजे कल्पित नेर झाले आहे ! हळू घोक (शब्द पाहू लागतो) बी. ए. यू –

**दिनू** : धुळे, अमळनेर, एरंडोल –

**दामू** : लागलास का पुन्हा ओरडायला ? (वेडावून) धुळे, अमळनेर – मोठा आला आहे भूगोल करणारा ! हळू घोक.

**दिनू** : अन् तू मोठा आला आहेस शब्द काढणार ! हळू घोकीत जा ! तुला वाटले तर माजघरात जाऊन बैस, धुळे – अमळनेर –

**दामू** : ऐकत नाहीस ? नाही ? देऊ का भडकावून एक श्रीमुखात ?

**बिनू** : कारे दादा त्रास देतोस ? ए आई ग, हा दादा बघ मला उगीचच्या उगीच मारतो आहे. धुळे – अमळनेर –

**दामू** : मारतो कारे ? नाही ग आई, हाच मोठमोठ्याने ओरडतो आहे सारखा, अन् अभ्यास करू देत नाही. आता ओरड तर खरा, की सांगतो कसे काय आहे ते ! बी. ई. यू – (डिक्शनरी चाळू लागतो)

**दिनू** : ओरडेन, ओरडेन जा ! तुला भिईन की काय ? धुळे – अमळनेर –

**दामू** : दम खा ! काढतोच तुझे "धुळे अमळनेर"

(त्याला मारावयास धावून जातो : तो पळू लागतो.)

**बिनू** : आई, बघ ग हा दादा ! धुळे, अमळनेर (घरात पळून जातो.)

**दामू** : पळून गेला, नाहीतर दाखविला असता स्वारीला चांगला इंगा ! धुळे अमळनेर करतो मोठा ? येऊ दे आता बाहेर बच्चाजीला ! म्हणजे काढतो सारा खानदेश जिल्हा (जागेवर येऊन बसताना पेन्सिलवर पाय पडतो.) अरे, अरे, अरे गडबडीत पेन्सिल मोडून दोन तुकडे झाले तिचे ! पण हे बरे झाले ! एक तुकडा हरवला तर दुसरा आहेच अन् आज पाटीवर शुद्धलेखन काढायचे आहे कुठे ! हे एवढे शब्द काढले की झालं काम ! अबब ! केवढा लांबलचक शब्द हा ! (डिक्शनरी उघडतो) बी. ई. ए. यू.

(दिनू जातो.)

**दिनू** : दादा, तुला आईने –

**दामू** : आलास का पुन्हा त्रास द्यायला ! बी. ई. ए. यू –

**बिनू** : तुला आईनं चहा घ्यायला बोलाविले आहे, यायचं असेल तर ये, नाही तर नको येऊ (दिनू जातो)

**दामू** : अरे चोरा ! नको येऊ काय ? म्हणजे एकट्याला चहा प्यायला ! मग काढीन मी शब्द (दामू जातो. जगू दुसरीकडून येतो.)

**जगू** : (धापा टाकीत) दादा, दादा, अरे ती बघ तिकडे – (पाहून) अरेच्या !

दादा कुठं गेला ? इयं तर दादाही नाही आणि दिनूही नाही ! हां – हेच ते चित्राचे पुस्तक ! (रीडर उचलतो) कशी छान चित्रे आहेत, रंगी बेरंगी ! बरं सापडलं आहे आयतंच ! शेजारच्या रघूला दाखवतो आता नेऊन ! अस्सं लपवून न्यावं, नाहीतर दादा पाहील एखादा ! आलाच दिनू !

(जगू दामूचे रीडर घेऊन जातो. दिनू येतो.)

**दिनू** : धुळे, अमळनेर – पुढं काय वरं ! किती तालुके आहेत हे ! धुळे अमळनेर पण पुढचा कोणता तालुका ! (भूगोलात पाहतो, दामू येतो)

**दामू** : अरे, माझं रीडर काय झालं इथलं ? आता होतं की इथं ! दिन्या रामोशा एवढ्यासाठीच आधी धावत आलास काय ? आण माझं रीडर ! देतोस की नाही ?

**दिनू** : अरे वा: ? मला रे काय ठाऊक तुझं रीडर नि फिडर ! मी आपला भूगोल पाठ करीत बसलो आहे. मी कशाला घेऊ रीडर ?

**दामू** : भूगोल पाठ करीत होतास नाही का ? कसा देत नाही रीडर तेच पाहतो. (त्याच्याकडे धावत जातो.)

**दिनू** : (मोठ्याने ओरडून) कारे मारतोस दादा ? आई ऽऽ





**दामू** : दिन्या, हात तरी लावला आहे का तुला ? नाही ग आई, दिन्या उगीच कांगावा करीत आहे. त्यानं माझं रीडर लपवून ठेविलं आहे अन् आता देत नाही.

**दिनू** : मी शपथ घेईन ! पाहिलंसुद्धा नाही तुझं रीडर मी ! तूच कुठं तरी टाकून दिलं असशील, आणि मला विचारतो आहेस !

**दामू** : कुठं तरी टाकून दिलं ? आता इथं नव्हतं का ? तुझ्या देखत तर शब्द काढीत होतो.

**दिनू** : अरे त्या गादी बिदीत असेल बघ ! रात्री तू पडल्या पडल्या वाचीत नव्हतास का ?

**दामू** : खरे रे खरे ! चल आपण या गाद्या उलगडून पाहू.

**दिनू** : चल. धुळे, अमळनेर, एरंडोल, पाचोरे.

**दामू** : तो शब्द सुद्धा मी विसरलो. हां बी. ई. ए. यू. (दोघेही बिछाने उलगडतात)

**दामू** : बी. ई. ए. यू बिछान्यात तर नाही कुठं !

**दिनू** : मग गुंडाळून ठेव हे बिछाने ! धुळे, अमळनेर एरंडोल पाचोरे –

(बिछाने गर्दीने गुंडाळून ठेवितात, त्यातच दामूचे कपडे व टोपीही गुंडाळून ठेवितात. दोघेही आपापल्या जागी बसतात.)





दामू : बी. ई. ए. यू. आता शब्द कसे करावे बुवा ?

दिनू : (हसत) भलं झालं, आता एका माणसाला मार बसणार ? धुळे, अमळनेर – एका माणसाला मार बसणार - धुळे – अमळनेर –

दामू : हसतोस काय ? तूच लपविलं आहेस पुस्तक ! आण पाहू तुझी पिशवी ? मला तुझा झाडा घ्यायचा आहे.

दिनू : तर तर ! आणीत नाही जा !

दामू : आणीत नाहीस ! बघू या बरं आता गंमत ! आण पिशवी (त्याच्या अंगावर धावून जातो तोच पाय पडून दिनूची पाटी फुटते )

दिनू : फोडलीस का माझी पाटी ? आता आईला सांगतो.

दामू : सांग सांग जा ! मुद्दाम पाय दिला का पाटीवर ? तूच मुद्दाम पाटी वाटेत ठेवलीस ? मीच सांगतो आईला की या दिन्याने माझे रीडर लपविलं आहे ! आण इकडे ती पिशवी (पिशवीची ओढाताण होते.) बंद तुटतो.

दिनू : धुळे – अमळनेर – सोड पिशवी – सोडना रे . धुळे –

दामू : रीडर दे ! नाही सोडीत पिशवी ?

दिनू : धुळे, अमळनेर – सोड, – पिशवी सोड (जोराने पिशवी ओढतो, बंद तुटतो, दिनू पडतो.) तोडलास का बंद पिशवीचा ? आता आईला सांगतो.

दामू : मी तोडला का बंद ? मी नुसती पिशवी धरून ठेविली होती. तूच जोरानं ओढलीस अन् माझं नाव घेतोस का ?

दिनू : येऊ दे बाबांना आता ! म्हणजे चामडीच लोळवायला सांगतो ! धुळे अमळनेर (दोघेही आपापल्या जागेवर बसतात.)

दामू : कोणता तो मोठा शब्द ! बी. ई. ए. यू. – पण आता शब्द करायचे कसे ! रीडरच नाही मुळी ! दुसरा अभ्यास पहावा. दुसरा तास काय बरे आहे ? हात् तिच्या ! टाइमटेबल गेलं रीडरमध्ये !



**दिनू** : (वेडावीत) टाइमटेबल गेलं रीडरमध्ये ? मास्तर सांगतात रोज की टाइमटेबल भितीला लावावं, ते उगीच का ? घ्या आता – छडी लागे छम छम – –

**दामू** : दिन्या, तुला रे कोणी चोंबडेपणा सांगितला आहे हा ? जाऊ दे माझं टाइमटेबल गेलं तर ?

**दिनू** : तुला बोलतो आहे का मी ? आम्ही आपले मनाशी बोलतो.

**दामू** : असे आहे का ? दाखवू का एकदा इंगा ?

**दिनू** : हो हो दाखीव, धुळे अमळनेर – आईला सांगेन – टाईमटेबल रीडरमध्ये.

**दामू** : शेजारच्या गणूला अभ्यास विचारून येतो (जाऊ लागतो.)

**दिनू** : मी बाबांना सांगेन की एक मनुष्य अभ्यास टाकून खेळायला गेला होता.

**दामू** : सांग जा – खेळायला जातो आहे का मी ? (जातो.)

**दिनू** : गेला की दादा बाहेर ! अरेरे ! माझं टाईमटेबल हरवलं असतं तर मी नसतो गेलो असा ? धुळे, अमळनेर – (शिटी वाजवीत जगू येतो.)

**दिनू** : जग्या, कुठली रे शिटी ही ? माझी वाटतं !

**जगू** : हो आली आहे तुझी ! शेजारच्या रघूला मी चित्रे दाखविली, तेव्हा त्याने दिली मला ही शिटी ! (शिटी वाजवितो.)

**दिनू** : जगू आपल्याला दे बुवा ही शिटी. मी तुला चित्रांचे पुस्तक देईन मग. पाहू वरं कोण देतो शिटी. (डोळे मिटतो व हात पसरतो.) जगू देतो का दामू देतो ? जगू देतो की दामू देतो.

**जगू** : जगू देतो. पण तू पाहतोस डोळे उघडे ठेवून ! अगदी डोळे मिटून घे !

**दिनू** : हं, हे घे अगदी डोळे मिटून घेतले ! आता कोण देते पाहू ! जगू देतो का कोणं देते ? (जगू जवळ येतो.)

**जगू** : बघू नकोस हं ! हं, ही घे शिटी (त्याच्या हातावर हात मारून पळून जाऊ लागतो.) मिळाली शिटी ?

**दिनू** : अरे चोरा, फसवतोस काय ? आता घेतोच शिटी. (जगू व दिनू पळून जातात. दामू येतो.)

**दामू** : दुसऱ्या तासाला भूगोल आहे. इंग्लंडमधली शहरे करायची आहेत. काल झाली त्याच्यापुढे ! पण काल किती झाली हे कुणाला ठाऊक ? (भूगोल काढतो.) इंग्लंडमधील शहरे ! (दोनदा घोकतो) काय आहे हे नाव ! हे, ऑक्सफर्ड आणि केंब्रिज–विद्यालयाकरिता प्रसिद्ध ! ऑक्सफर्ड आणि केंब्रिज. कें–ब्रि–ज.

(दिनू येतो व आपल्या जागेवर बसतो.)

**दिनू** : बस म्हणावं आता रडत ! आपलीच की नाही शिटी ? धुळे–अमळनेर.

**दामू** : दिन्या शिटी आहे काय रे ? बघू या बरं कशी आहे ती ? (शिटी वाजवितो.) ऑक्सफर्ड – ऑक्सफर्ड.

**दिनू** : आता कशाला बघू या बरं ? काल आम्हाला भवरा दाखवीत नव्हतास नाही का ? आता घे शिटी ! (शिटी वाजवितो व जवळच ठेवतो.)

**दामू** : नाही तर नको देऊ जा ! आम्ही दुसरी आणू चांगली ! ऑक्सफर्ड आणि केमरीज विद्यालयाकरिता प्रसिद्ध – प्रसिद्ध (मनाशी) या

स्वारीला फसविलं पाहिजे. (मोठ्याने) ऑक्सफर्ड आणि केमरीज (घरात जातो.)

**दिनू** : धुळे, अमळनेर, एरंडोल, पाचोरे. . .फार तालुके आहेत या जिल्ह्यात (ऐकून) जग्या शिटीसाठी अजून रडतोच आहे वाटतं ! (शिटी वाजवितो) धुळे, अमळनेर – (शिटी वाजवून खाली ठेवतो, तोंड पुशीत दामू येतो व आपल्या जागेवर बसतो.)

**दिनू** : दादा, काय खात होतास रे आता ?

**दामू** : कुठे ! काही नाही ! मी आईजवळ गेलो नाही, आईने मला लाडू दिला नाही, मी तो खाल्ला नाही ! काही नाही ! ऑक्सफर्ड आणि केमरीज विद्यालयाकरिता प्रसिद्ध (दिनूकडे पासून हसतो.)

**दिनू** : हसू नकोस काही ! मी पण घेतो आईजवळून लाडू. धुळे–अमळनेर, एरंडोल (जातो.)

**दामू** : कसा फसविला चोराला ! आता ती शिटी घ्यावी तेवढी.

(जाऊन शिटी घेतो व जागेवर बसतो.)

**दामू** : ऑक्सफर्ड आणि केमरिज, ऑस्कहर्ट आणि केमरिच – ऑस्कहर्ट आणि केमरिच (दिनू येतो.) मिळाला लाडू ! धम्मक लाडू दिला असेल आईनं. लाडू पाहिजे नाही का ? ऑस्कहर्ट आणि केमरिच (दिनू जागेवर बसतो.)

**दिनू** : नसू दे लाडू नसला तर ! धुळे–अमळनेर–एरंडोल – अरे इथली शिटी काय झाली ? आता इथं होती की ! (दामू शिटी वाजवितो.)

**दामू** : ऑस्कहर्ट आणि केमरिच. . .

**दिनू** : अरे चोरा, शिटी चोरलीस काय ? चोर कुठला ? . .

**दामू** : दिन्या गाढवा ! मी तुझा दादा, अन् मला चोर म्हणतोस ! काल भरतभाव पाठ केलास, त्यात हेच शिकलास वाटतं ? भरत असा रामाला चोर म्हणत नव्हता !

दिनू : पण राम सुद्धा असा भरताच्या शिट्या चोरीत नव्हता ! मोठा आला राम व्हायला ! आण माझी शिटी.

दामू : देत नाही जा ! मला चोर म्हणतोस नाही का ?

दिनू : कसा देत नाहीस पाहू ! धुळे–अमळनेर (त्याच्या अंगावर धावून जातो. दोघांची मारामारी होते. जगू येतो.)

दामू : (दिनूला खाली पाडून) शिटी पाहिजे का ? देऊ का एक शिटी तोंडात !

दिनू : जग्या ओढ त्याचा पाय ! म्हणजे तुला शिटी देईन !

जगू : तू कशाला हवा शिटी द्यायला ! मीच घेतो ही बघ ! (शिटी घेऊन जगू जातो.)

दामू : पाहिजे का शिटी ! बोल ! म्हणशील का चोर आता !

दिनू : आई, बघ ग हा दादा कसा बोकांडा बसला आहे !

दामू : बोकांडा बसलो आहे कारे ? तूच मला मारायला आलास. शिटी पाहिजे ?

(दोघेही आपापल्या जागेवर जाऊन बसतात.)

दिनू : तुला तरी कुठे मिळाली ? तुला नाही, मला नाही घाल कुत्र्याला ! धुळे–अमळनेर–एरंडोल–पाचोरे–पाचोरे.

दामू : ऑस्कहर्ट आणि केपरीच–ऑस्कहर्ट आणि केपरी–ऑस्कहर्ट आणि केपरी, आस्क–(कुत्र्याचे ओरडणे ऐकू येते. दामू घोकीत खिडकीजवळ जातो.) आस्कर आणि खेपरी, आस्कर आणि खेपरी. दिन्या, ही बघ कुत्र्यांची भांडाभांडी. आस्कर आणि खेपरी. चास्कर आणि – आपला मोत्यापण आहे रे – खेपरी, चास्कर आणि खेपरी–चास्कर, मोत्या, छू: ! छू: मोत्या ! चास्कर आणि खेपरी, दिन्या, बघ तर खरं ! मोत्या छू:

दिनू : कुठे रे ? कुठे पाहू ! धुळे, अमळनेर ! (धावत खिडकीकडे जाऊ लागतो. वाटेत पाय लागून दामूची दौत सांडते.) दादा, दौत सांडली रे !

**दामू** : कशी सांडली ? केलास सारा घोटाळा ! वर्ड बुकावर सगळी शाई सांडलीस ! आज इन्स्पेक्शन आहे तेथे काय दाखवू आता ?

**दिनू** : मी काय केलं रे ? तूच दौत उघडी टाकलीस ! वर्डबुक असं पसरून ठेवलंस ! मी नुसता येत होतो तर पाय लागला फक्त माझा !

(हाताने शाई भरू लागतो.)

**दामू** : आता चाकू तरी दे ! म्हणजे वर्ड बुकावरची शाई तरी खरडून टाकतो

(जगू येतो व शिटी वाजवितो.)

**जगू** : दादा, दिनू, जेवायला चला लौकर. चल दिनू, दादा, उठ !

**दामू** : आलो रे बुवा ! सगळा घोटाळा झाला !

(तिघेही घरात जातात. पांडू गडी येतो.)

**पांडू** : तीन मुले आहेत, पण तीन तऱ्हेची आहेत ! घर झाडता नकोसे होते ! काय कागद ! काय बुके ! नुसता उकीरडा करून ठेवला आहे ! दामूरावाचे कपडे या गादीत ! आणि शाळेत जाताना कपडे कुठं आहेत म्हणून ओरडेल आता. असू देत गादीतच कपडे ! ही बुके एवढी पिशव्यातून ठेवावी म्हणजे झाले ! कोणाची बुके कोणती हेही समजत नाही ! सगळी बुके गोळा करून अर्धी एका पिशवीत आणि अर्धी दुसऱ्या पिशवीत ठेवतो, मग घेतील आपली पाहून !

(सर्व पुस्तके दोघांच्या पिशव्यातून भरतो व जातो. दामू व दिनू येतात.)

**दिनु** : धुळे, अमळनेर–

**दामू** : बरे आता राहू दे तुझं धुळं अमळनेर ! कपडे घाल लौकर ! घंटेची वेळ झाली. अरे, माझी पुस्तके काय झाली ? पिशवीत एवढीच सारी ! दिन्या पाहू दे तुझी पिशवी !

**दिनू** : मी नाही दाखवीत जा !

**दामू** : तुझी पिशवी एवढी मोठी रे कशाने ? माझी पुस्तके घेतली वाटतं ? पाहू पिशवी !

**दिनू** : नाही दाखवीत ! आता दुसरा बंद तोडायचा आहे वाटतं ! सारा घोटाळा केला आहेस माझा ! पिशवीचा बंद तोडलास ? पाटी फोडलीस.

**दामू** : आणि तू काय कमी केलं आहेस ! दौत सांडलीस ! वर्ड बुक बिघडविलंस, रीडर लपविलंस, पुस्तके चोरलीस ! अरे पण माझे कपडे कुठे आहेत सकाळी मी इथं ठेविले होते ! काय करावे ! शाळेची तर वेळ झाली आणि कपडे नाहीत ! दिनू, मी शाई तयार करतो, दोघांचीही होईल ! तू आईला सांग, म्हणावं दादाचे कपडे नाहीत. पांडूनं केरात नेले वाटतं. तर आता पेटीतून नवे कपडे काढून दे ! (दिनू जातो) पांडू अगदी आंधळा आहे ! केरात कपडे सुद्धा दिसले नाहीत त्याला ! शाईची बाटली कुठे आहे बुवा ?

(दिनू येतो.)

**दिनू** : दादा, आई म्हणते, तिला काम आहे, आज तू माझे कपडे घाल, आणि मी जगूचे घालतो.

**दामू** : तुझे कपडे मला रे कसे होतील ? लांडे नाही का होणार ? जा, नीट सांग आईला. (दिनू जातो) काय घर आहे पहा. शाईची बाटली सुद्धा सापडत नाही ! हं, ही पहा सापडली एकदाची. आता दोघांच्या दौती भरून घ्याव्या (दिनू येतो.)

**दिनू** : दादा, आई म्हणते, नाही तर मर !

**दामू** : बरं तर मग ! दे तुझे कपडे मला आणि तू जगूचे घे !

**दिनू** : हे घे –(आपले कपडे त्याला देतो.) जगू, अरे जग्या, मला तुझी टोपी कोट दे पाहू ! आण रे लौकर !

**जगू** : (आतून) आणतो रे (दामू कपडे घालतो.)

**दामू** : हं दिन्या, ही बाटली घे आता ? मी दौत धरतो, तू शाई ओत. (दिनू शाई ओततो. जगू हळूच कपडे घेऊन दिनूच्या मागे उभा राहतो.)

**दामू :** हं अस्सं ! ओत आणखी ! आता ही दुसरी दौत ! ओत तिच्यात.

**जगू :** (एकदम ओरडून) हे घे कपडे.

(दिनू घाबरतो. हातांतून बाटली पडते. दामूच्या कपड्यावर शाई पडते.)

**दिनू :** केवढ्यानं ओरडलास रे जग्या ? भ्यालो ना मी !

**दामू :** अन् तू माझ्या कपड्यांवर शाई सांडलीस ती !

**दिनू :** तुझे नाहीत काही कपडे ते ! माझे आहेत (कपडे घालतो.)

**दामू :** बरं ! चला आता लौकर, उशीर होईल ! आज आणखी इन्स्पेक्शन आहे.

**दिनू :** इन्स्पेक्शन आहे, अन् तुझा पोशाख हा असा !

**दामू :** अरे पोशाख राहू दे. इतका वेळ सारखा अभ्यास केला तरी अभ्यास सुद्धा झाला नाही. चल, चल, लौकर.





# कावळे

**चिं. त्र्यं. खानोलकर**

(चार कावळे घाईघाईने धावत येतात. ओरडतात. इतर कावळे गोळा होतात

| | |
|---|---|
| **म्हातारा कावळा :** | भर दुपारी कट्कट् काय रे पोरांनो ?<br>आपल्यापैकी सुखरूप सगळे<br>आहेत ना रे पोरांनो ? |
| **कावळा १ :** | आहेत सगळे खुशाल हो<br>कुणी घरांवर कुणी दारांवर |
| **२ :** | कुणी झाडांवर कुणी झाडाखाली<br>मजेत अगदी मश्गुल हो |
| **३ :** | तरीहि आपण काळे काळे<br>खूपच काळे बिलकुल काळे |
| **४ :** | देवबाप्पा तो अगदी चक्कर<br>केले आम्हा काळे ठिक्कर<br>ठिक्कर ठिक्कर ठिग्<br>ठिक्कर ठिक्कर ठिग् |
| **म्हातारा कावळा :** | (प्रौढ आवाज) काय रे पोरांनो |

मारताय का रे डिग
आज तुम्हाला झाले काय ?
काळ्या रंगामध्ये अगदी आजच
जन्मा आला काय ?
देवबाप्पाला शिव्या घालता
याच्याबद्दल घडेल अद्दल....
आकाशाला लावता पाय ?

कावळा ३ : क्षमा करा हो आजोबा
ऐकून थोडे घ्या हो

इतर : काव–काव–काव–काव

कावळा ४ : फोडता का रे टाहो
ऐकून थोडे घ्या हो

कावळा १ : पलीकडच्या तीरावर
पिंपळाच्या झाडावर

कावळा २ : कावळा गोरा गोरा पान
बसला आहे कसा गुमान

३ : आमच्या सारखा दिसतो थेट
घेऊ चला हो त्याची भेट

४ : काय हो त्याची पिसं ऽऽ
मऊ तलम
मऊ तलम
चम् चम् चम्
हे असं कसं ? असं कसं ऽऽऽ





| | |
|---|---|
| **म्हातारा कावळा :** | चुप् रहा चुप् रहा<br>कावळा कसा गोरा असेल ? |
| **कावळा ४ :** | (एकदम) आहे आहे आहे ऽ ऽ ऽ |
| **म्हातारा कावळा :** | गप् रहा गप् रहा<br>तो कावळा नसेल कावळा नसेल<br>मी आहे काळा<br>माझे वडील होते काळे<br>माझे आजोबाही काळे<br>तुम्ही आमची बाळे<br>तुम्ही काळे कावळे |
| **इतर :** | हे चौघेजण बेटे<br>बोल्तायत् खोटे<br>यांना करा लंबे<br>करा ऽ लंबे करा ऽ लंबे<br>काव् काव् काव् काव् |





(इतर त्या चौघांभोवती नाचतात.)

मारा थपडा यांना
मुरगळा हो माना
मारा चोंचा ठिस् ठिस्
काढा यांचे पिस्‌न्‌पिस्

**म्हातारा कावळा :** थांबा ऽ ऽ
मी सांगतोय आजोबा
थांबा ऽ ऽ

(इतर थांबतात)

काय रे पोरांनो
पांढरा कावळा आहे, कबूल

**इतर :** कबू ऽ ऽ ल कबू ऽ ऽ ल

**म्हातारा कावळा :** थांबा ऽ ऽ
मी विचारतोय आजोबा

काय रे कावळेराव
तो ओरडतो का काव् काव्

इतर : काव् काव् काव् –
तो कावळा पांढरा
ओरडतो का काव् काव् काव् ?
बो ऽऽ ला
लारांग लारांग लारांग
बो ऽऽ ला
नायतर तोडू तुमची टांग

कावळा १ : आं ?

२ : आं ऽऽ

३ : आं आं

४ : उहूं उहूं
उहूं उहूं

म्हातारा कावळा : मग तो ओरडतो का
कुहू ऽऽ कुहू ऽऽ कुहू ऽऽ

इतर : बोला ऽऽ
काव्–काव्–काव्–
नायतर टाकू तुमचे नाव
सोडा आमचा गाव
काव् काव् काव्

म्हातारा कावळा : जा रे सगळेजण
सांगा त्याला सांगा त्याला
काव् काव् बोला

इतर : इकडे तळे

तिकडे मळे
इकडे आड
तिकडे विहीर
इकडे डोंगर
तिकडे नदी
ऐल तीर
पैल तीर
पिंपळ पार
चला चला
निघा निघा
व्हा रे चौघे पुढे
एक दोन तीन
चार पाच सहा
समोर पहा
समोर पहा

(चार रांगा करून सगळेजण नाचत नाचत वाटोळ्या गिरक्या घेत पिंपळपाराकडे येतात)
(पहिल्या रांगेतील इतरांपैकी एक कावळा)

**इतरांपैकी १ :** (वर बघून)
कुठाय तो ?
कुठाय तो ?

**कावळा २ :** तो पहा !
तो पहा !
हिरव्या हिरव्या पानांमध्ये
मला दिसतो.
मला दिसतो.

**कावळा २ :** मला पण

मला पण
कावळे आम्ही सगळेजण
करू विनंती – काव् काव् म्हण,
काव् काव् म्हण.
फेर धरा
फेर धरा

इतर : काव् काव् काव्
आम्ही सगळे कावळेराव
काळे काळे फार
जगतो वर्षे एक हजार
तर् तर् तर् तर्
खाली उतर्
खाली उतर्
भर् भर् भर् भर्
खाली उतर्
खाली उतर्
कोण तू रे ?
कोण तू ?

(एक कावळा पुढे येऊन वाकडी मान करून)

एक कावळा : ढुम् ढुम् ढुम् ढुम्
बसलास गप घुमं
खटर् खटर् खटर्
खाली उतर खाली उतर

इतरांपैकी दुसरा एक : क्याँक क्याँक क्याँक क्याँक
याला खाली खे ऽऽच्
ऐट केवढी याची पहा

करीत नाही हुं की चूं हुं की चूं ऽऽ
चकर् चकर् चकर् चकर्
खाली उतर – खाली उतर

**इतरांपैकी आणखी एक :** इरिग फिरिग् इरिग फिरिग्
हरा भरा हरा भरा
असेल मोठा सफेद गोरा
अणंग् भणंग् अणंग् भणंग्
उतर् याचा तोरा
गरा गरा गरा गरा
होईल गोरा मोरा

**इतरांपैकी आणखी एक :** काय रे चोरा
हरामखोरा
तू तर एकटा एकटा एक
आमचे म्हणणे ऐक
तू तर एकटा एकटा एक
आहोत आम्ही हजार कैक

(सगळेच मोठ्यामोठ्याने ओरडतात. गिरक्या घेतात. उडण्याचा अभिनय करतात.)
(वर बसलेला शुभ्र गोरा कावळा गुपचूप खाली उतरतो. हळूहळू सगळे शांत होतात.)

**कावळा १ :** काय हो पाहुणे
तुम्ही कुठले कोण ?
कुठले कोण ?

**कावळा २ :** कावळेच का तुम्ही कावळेच का ?
घुम्म असे तुम्ही बसू नका.

**कावळा ३ :** मधुर मधुर
काढा सूर
म्हणा म्हणा म्हणा म्हणा



काव् काव् काव् काव्

**कावळा ४ :** पंख तुमचे गोरे पान
अंग तुमचे गोरे पान
नका बसू असे गुमान

**इतर :** काव् काव् काव् काव्
सांगा नाव – सांगा नाव.

**शुभ्र कावळा :** दूर हटा
दूर हटा
हिमालयातून आलो मी
काळे ठिक्कर हीन तुम्ही
व्हा व्हा दूर
तुम्ही काळेचूर काळेचूर
दोस्त आमुचे हंस–मयूर
व्हा रे दूर व्हा रे दूर

**कावळा १ :** ढवळ्या ढवळ्या कावळ्या

काय रे तुझा तोरा
आम्ही काळे अन् तू गोरा
म्हणून का रे वटवट चोरा

कावळा २ : मुकाट्यानं हो कबूल
नाहीतर देऊ गचांडी
देतो काय रे आम्हास हुल्
समजुन ठेव फोडू नरडी

कावळा ३ : काळे कोण ?
गोरे कोण ?
देवाजीने रंग दिले
देवाजीने रूप दिले
गोरा असणे हा काय तुझा
नव्हे गुण, नव्हे गुण

कावळा ४ : चल निघ इथून जा उडून
नाहीतर बोल काव् काव्
रहा इथे कावळा म्हणून
उगाच नको तुझा डौल
फुकट तुझा गर्व फोल
काव् काव् काव् बोल

शुभ्र कावळा : कधिच्च नाही कधिच्च नाही
उगिच्च नाही उगिच्च नाही
हिमालयातून आलो मी
मज काय कमी – मज काय कमी
मोत्यांच्या चारा मला खायला
सोन्याचं ताट मला जेवायला



दुधाचं पाणी मला पोहायला
देव आमुचा शंकर भोळा
तुम्ही तर सगळे काळे ठिक्कर
तिरसट तुम्ही अगदी चक्कर
फासून आता काळे डांबर
तुम्हात ेणे मोठे पाप
जवळ याल तर देईन शाप
शंकर–शंकर–शंकर
बम् बम् बम् बम् भोला
जळाल तुम्ही चटा चटा
दूर हटा दूर हटा

**इतरांपैकी एक कावळा :**

हाणा मारा हाणा मारा
अनेक आम्ही हा तर एक
उडवू याची दाणादाण
घेऊ याचा चटकन प्राण

दुसरा एक । हिमालयातील भोंदू हा
बुडु बुडु बुडु बुडु
तुटून पडू तुटून पडू
मोठा आलाय लुच्चा साव
काव् काव् काव् काव् काऽव काऽव

(बगळे त्याच्याभोवती फेर धरून भयानक नाचतात. तो रडण्याचा अभिनय करून उडून जातो. नाच सुरूच आहे.)

(प्रवेश)

(शुभ्र गोरापान राजहंस उभा आहे. त्याच्या भोवती सरदार बगळोजी उभे आहेत. समोरच पांढरा कावळा अदबीनं उभा आहे.)

राजहंस । न्यायाधीश आम्ही पक्ष्यांचे . . .
दूध पितो हो फेकून पाणी
खरे काय अन् खोटे काय
ओळखतो हो आम्ही चट्‌कनी

बगळा १ । राजहंस तुम्ही न्यायबुद्धीचे
सागर मोठे



सेवक आम्ही दरबारी कोण्या
अगदी छोटे
रत्ने म्हणुनि विकिती कोणी
दगड नि गोटे
खरे खपविती किमतीस भारी
अगदी खोटे
राजहंस तुम्ही न्यायबुद्धीचे
सागर मोठे

बगळा २ : आलासे हा इथे कुणि तरी
न्याय मागण्या पक्षी एक
या रानातील नाही कुणाची
याची अगदी ओळखदेख

बगळा ३ : म्हणती याला अमुनी कावळे
मध्येस तू रे इतरांपैकी
कावळाच तू दवळा दवळा
कबूल कर की ! कबूल कर की !

बगळा ४ : राजहंस हो, न्यायाधीश महाराऽज
न्याय काय तो द्यावा तुम्ही
विनंती आहे आज
गोऱ्या गोऱ्या बोल पाखरा
काय तुझे ते म्हणणे
भिवू नको रे कुणास अगदी
अवळपासही इथे फिरकणे
अशक्य अगदी अशक्य अगदी
कडेकोट रे इथे अमुचा असे पहारा
गोऱ्या गोऱ्या बोल पाखरा

**शुभ्र कावळा :**

त्रिवार वाकुन करितो मी मुजरा
न्याय मिळावा हिमालयातील
शुभ्र पाखरा
खरे सांगतो स्मरून शंकरा
मी नव्हे कावळा गोरा गोरा
कैलासाहून आलो इथे
शंकराच्या आज्ञेवरूनी
गरुड माझा असे मित्र अन्
रोजच येतो विष्णु तेथे गरुडावरूनी
पृथ्विलोकीच्या पक्ष्यांचा तो
आहे राजा
काळे ठिक्कर इथे कावळे मारिती गमजा
म्हणती मजला उगिच कावळा
मी तर आहे ढवळा कावळा
मी तर आहे ढवळा कावळा
अक्कल त्यांना नाही बिलकुल
उगाच करती कर्कश कलबल
पाठलाग ते करिती माझा
दोस्त आमुचा गरुड राजा
श्रीविष्णुही मजला म्हणती
स्वर्गामध्ये येई पाखरा
पहा सूर्य अन् पहा तारका
इंद्रलोकीचा पहाच नखरा
दुष्ट कावळे म्हणती मजला
अनेक आम्ही तू तर एक
मारून तुजला टाकू देख !
कसला आहे न्याय इथे हो

हे नव्हे कावळे चक्क भुते हो !
उगाच करिती गलबल गोंधळ
काय मवालीपणा असे हा
न्यायाधीश तुम्ही न्याय करा हो
या काकांना शिक्षा द्या हो
हिमालयातील पक्ष्याचा या
पुन्हा एकदा मुजरा घ्या हो
मुजरा घ्या हो
शंकर शंकर भोला
भोला भोला शंकर
श्रीगुरु गुरु गुरु गुरु
वाजे डमरू डमरू
शंकर माझे सद्गुरु
मी तर त्यांचा सच्चा चेला
अन्यायाची घ्याल तुम्ही जर
खोटी बाजू
पाठवतील ते नंदी बैला
शंकर शंकर भोला
भोला भोला शंकर
येईल हवे नंदी बैल
उडविल तुम्हा ऐल नी पैल
होतिल हाडे समजा सैल
पिसील तुमचे पीस न् पीस
असे मक्याचे उभे कणीस
होईल तुमचा चेंदामेंदा
नंदी अमुचा आहे खंदा
न्याय करा हो अगदी पक्का

कावळ्यास द्या लाथा–बुक्क्या
बाहेरून ते काळे काळे
आतुनही ते काळे काळे
मनचे अगदी दुष्ट विचारे
शिक्षा लावा अक्कलमंदा
कराच त्यांचा चेंदामेंदा
नंदी अमुचा शूर नी खंदा
शंकरजींचा मी हो बंदा
न्याय करा हो न्याय करा बेदरकार
करा कावळ्यां बेडापार
न्यायाधीश सरकार–न्यायाधीश सरकार

बगळा १ : कव कव
बक बक याने बरीच केली

बगळा २ : बडबडला हा पुष्कळ पुष्कळ

बगळा ३ : खरे काय अन् खोटे काय
काय बरोबर नि बाष्कळ काय

बगळा ४ : ठरवतील हे राजहंस महाराज

राजहंस : शांत व्हा. शांत व्हा.
ही न्यायाची असे इमारत
राखा न्यायाची हो किंमत
का बगळ्यांनो तुम्ही नाहक
असे बोलता असून सेवक ?
शांत व्हा. शांत व्हा.
हिमालयातील तू
असशीलसुद्धा

तरीहि हिमालयी
रहातात कावळे
रहातात परंतु
हिमालयातील तू
काय नाव रे तुझे ?
सांगशील का ?
सांगच आम्हा नाव तुझे रे !

**शुभ्र कावळा :** कैलासपक्षी मी
नव्हे कावळा
कैलास म्हणुनिया
हाक मारीती शंकर मजला

**राजहंस :** ठीक परंतु
ओरड आता शब्द न वदता

**शुभ्र कावळा :** कधीच नाही
कधीच नाही
कर्कश ओरड जमणे नाही
शंकरजींना ओरडणे ते
बिलकुल अगदी पसंत नाही
म्हणून काळा पक्षी तेथे
नावालाही दिसणे नाही
उगिच्च काही उगिच्च काही सांगु नका
उगिच्च शंकरजींचा राग ओढवुनि
घेऊ नका
शप्पथ आहे शप्पथ आहे
घेतलिसे म्या त्यांच्या पाशी
मोडायाला लावू नका ती
कैलासाचे आम्ही रहिवाशी

शंकर शंकर भोला
भोला भोला शंकर

**बगळा १ :** बोल रे बोल
कुहू कुहू क्वॅक् क्वॅक्
म्याहो म्याहो
चिव् चिव् चिव्

**बगळा २ :** अथवा डुबुक डुबुक
कोकोच्च कुक् कोकोच्च कुक्

**बगळा ३ :** अथवा मंजुळ मैनेवाणी
गा रे गा रे गा गा गाणी

**बगळा ४ :** चटर् पटक् चटर् पटक्
कुडुक कुडुक कुडुक कुडुक
अथवा म्हणरे राघुवाणी
विठू विठू ऽऽ
घुं घुं घुं घुं घुबडा परि तरी ?
बसू नको रे नुसता घुम्
कबुतरापरी ओरड अथवा
गुटुरंघुम गुटुरंघुम्
जमेल तसे काहीबाही

**शुभ्र कावळा :** मुळिच्च नाही
मुळिच्च नाही
शंकर शंकर म्हणेन फक्त

**राजहंस :** चोंच मारुनी काढा रक्त
ओरडेल हा नंतर सच्चे
समजत आहे बेटा आम्हा
न्यायाधीश हो अगदी कच्चे

घेऊन याला जाहो लवकर
रे बगळयांनो, चोची तुमच्या अणकुचिदार
खुपसा याच्या अंगामध्ये आर नि पार
न्याय आमचा कठोर फार
ओरड अथवा खरे काय ते
हिमालयातील शुभ्र पाखरा
दावू नको तू नुसता तोरा
न्यायापुढती आम्ही शंकरा
भीत नाही रे भीत नाही
इथे भिण्याची रीत नाही रे
रीत नाही

शुभ्र कावळा : मुळिच्च नाही बिलकुल नाही
सांगू नका मज काहीबाही
मीही कुणाला भीत नाही भीत नाही

राजहंस : उचला याला बांधा मुसक्या
करतो बकबक फारच हा रे!
कोण समजतो स्वत:स हा रे!

(बाहेर कावळे मोठमोठ्याने ओरडतात. बगळे शुभ्र कावळयाला उचलतात.)

राजहंस : ओरडल्यावर खरे काय ते
घेऊन याला परत फिरा
चोची खुपसून अंगामध्ये
अगदी याला बेजार करा
जा ऽऽ

(प्रवेश)

(चार रांगा करून कावळे उभे आहेत. त्यांच्या पलिकडे चार बगळे एका खडका-भोवती उभे आहेत. खडकावर शुभ्र कावळयाला बांधून घातलेले आहे.)

कावळा १ : काव काव काव काव काव काव

जिरली की नाय ? जिरली की नाय ?
अडकुन पडले याचे पाय, याचे पाय

कावळा २ : फुकट्ट रे, फुकट्ट रे
फारच बुवा हा चिकट्ट रे !
चिकट्ट रे !

कावळा ३ : सफेत असला तरिहि कावळा
लपेल कायरे ? लपेल काय ?

कावळा ४ : या बगळ्यांच्या चोचा लागुन
रडेल धाय् धाय् धाय् धाय्
धरील अमुचे पाय

इतर : खुपसा चोचा रे बगळ्यांनो एकसाथ
पडेल बाहेर मनची बात

चारी बगळे : कोकच्च् को ऽऽ
कोकच्च् को ऽऽ

(हळू हळू म्हातारा कावळा येतो.)

म्हातारा कावळा : थांबा थोडे
चोचा खुपसू नका
मला विचारू द्या हो त्याला
ऐकिल माझे म्हाताऱ्याचे
शब्दविनंती करीन त्याला
गडबड घाई काही नको

इतर कावळे : ऐका अमुच्या आजोबांचे

(बगळे थांबतात. गडबड शांत होते.)

म्हातारा कावळा : (समोर जाऊन उभा राहतो)
बोल बा बोल

बाबा, खातोस का मार ?
याच्या चोची इतक्या अणकुचीदार
त्याहून परवडली तलवार
कावळा असलाच तर हुशार हो
काव काव ओरडून आमचा सरदार हो
खातोस का मार नाहक ?
हो तू अमुचा नायक.
आम्ही सगळे काळे तू आहेस गोरा
उगाच का मरायचे पोरा
आम्हाला वाटेल तुझा अभिमान
म्हाताऱ्याचा करू नकोस अनमान
हे तरणे पक्षी तुला फाडून खातील
फुक्कट पोरा मरून जाशील
तू आहेस कुठला कोण ?
तुझ्यासाठी रडेल कोण ?
गोरा कोण ? काळा कोण ?
देवाजीचे रंग दोन.
कावळा असलास तर कबूल कर
नसलास तरी कबूल कर

शुभ्र कावळा : शंकर शकर
मी आहे कबुतर

म्हातारा कावळा : शब्दाविना ओरड तर
नुसते नाव सांगू नको
स्वत:ला फसवू नको
आम्हाला फसवू नको
त्वरा कर. त्वरा कर.

(लांबून कुठूनतरी गुटुर्रघुम गुटुर्रघुम ऐकायला येते. कबुतरांची एक टोळी येते.)

कबुतर १ : गुटूर्रघुम गुटुर्रघुम गुटूर्रघुम

कावळे : ढुम ढुम ढुम ढुम

कबुतर २ : कुठाय कुठाय ते कुठाय कुठाय ?
ते खडकावर दिसतंय काय ?

कबुतर ३ : कबुतर अगदी दिसते थेट
आम्हांसारखे रोम् नि रोम्
ओरड ओरड गुटूरंघुम गुटूरंघुम

कावळा १ : रे रे कबुतर
बाजुस सर बाजुस सर
आहे तो रे, आमचाच तर

कबुतरे : (हसतात)
घुम घुम घुम घुम घुम

कावळे : (हसतात)
खॅंक् खॅंक् खॅंक् खॅंक्

कबुतर १ : रंगीत पक्षी आम्ही थोर
कुणि सोनेरी शुभ्र टपोर
तुम्ही कावळे काळेभोर
दिसता अगदी अगदी घाण
तो आहे रे गोरा पान गोरा पान
व्हा बाजूला ! निघून जा निघून जा !
नाहीतर रे युद्ध करा, युद्ध करा
दूर सरा दूर सरा दूर सरा

कावळा १ : आले मोठे गळा फुगवुनी
फुट फुट फुट फुट फुट फुटा

नायतर उडवू चट्टामट्टा चट्टामट्टा
तुम्ही कोण रे ? दूर हटा, दूर हटा

(एक कबुतर पांढऱ्या कावळ्यासमोर जाऊन उभे राहते.)

कबुतर १ : ओरड ओरड
गुटुर्रघुम गुटुर्रघुम

कावळा २ : ओरड ओरड
काव काव काव काव

(हे असेच दोनतीन वेळ चालते.)

म्हातारा कावळा : (दोघांनाही बाजूला करून)
व्हा बाजूला, काय भांडता
तुम्ही पोरे ?
काळे काळे कोण गोरे ?

शुभ्र कावळा : तुम्ही कावळे काळे काळे
कबुतर मी हो गोरे गोरे
व्हा बाजूला व्हा बाजूला
सोडा मजला रे बगळ्यांनो

बगळे : ओरड लवकर ओरड लवकर

कबुतर : गुटुर्रघुम गुटुर्रघुम

कावळा : काव काव काव काव

शुभ्र कावळा : (ओरडत नाही)
मुळिच्च नाही मुळिच्च नाही
जाळा अथवा कापा मजला
बिलकुल नाही बिलकुल नाही
शंकर भोला शंकर भोला

कबुतर : जिंकुनी आम्ही घेतो तुजला

कावळे : जिंकुनी आम्ही घेतो तुजला
नंतर ओरड खरे काय ते

म्हातारा कावळा : नको नको रे बाळांनो
पाया पडतो बाळांनो
युद्ध असे रे वाईट खोटे
मरतिल पक्षी छोटे मोठे
पाया पडतो बाळांनो
युद्ध नका हे खेळू भयंकर

शुभ्र कावळा : खेळा खेळा युद्धच खेळा
जय जय शंकर जय जय शंकर
भोलेनाथ !
म्हाताऱ्याचे पाडा दात
कबुतरांनो, गरुड तुमची करील साथ
पक्ष्यांचा मी होईन राजा
कबुतरांनो हवी तेवढी करा मजा
प्रचंड खेळा मारामार, हाणाहाणी
तोडून टाका या काकांचे दाणापाणी
या वगळयांच्या उखडा चोचा
राजहंसही कराच ठार
प्रचंड खेळा मारामार.

म्हातारा कावळा : अरे अरे अरे अरे
ऐकू नका रे, ऐकू नका रे
परकी हा रे,
परकी हा रे !

परकी हा रे !
नका मरू रे !
नका मरू रे !
आपसात झुंजू नका,
ऐका माझे ऐका ऐका
मारू नका रे एकामेका

**कावळे :** दूर सरा हो आजोबा
उट्टे आम्ही काढू यांचे
दुष्ट मवाली कबुतरांचे
समजतात ते कोण स्वत:ला ?

**कबुतर १ :** शंकर बोला शंकर बोला
जय जय शंकर बोला

(कबुतरांची आणि कावळ्यांची लढाई जुंपते. खडकावरील पांढरा कावळा तालासुरात युद्धगीत गातो.)

**शुभ्र कावळा :** धुडुम् धुडुम् धुडुम् धुडुम्
ढुम ढुम ढुम ढुम ढुम
युद्ध असे रे खेळा की
या काकांची नाचक्की
होऊ देत रे पक्की
होऊ देत रे पक्की

**चार कावळे :** पुढे सरा रे पुढे सरा
रेटा रेटा रेटा
कबुतरांना मागे रेटा
पंखांच्या रे चिंधोट्या
नरडी फोडा, नरडी फोडा
उखडुन टाका पिसे पिसे

होऊ देत रे पुरे हसे
फारच ताठा फारच ताठा
यांचा काटा मोडुन काढा
ढिशुम् ढिशुम्
ढुम् ढुम् ढुम्

**शुभ्र कावळा :** गुरू गुरू गुरू गुरू
वाजत डमरू डमरू
शंकर सद्गुरु शंकर सद्गुरु
बम् भोला बम् भोला
पायाखाली यांना घाला
डोळ्यामध्ये चोची घाला
एकच यांचा असतो डोळा
तोही फोडा तोही फोडा
युद्ध होऊ दे असे भयंकर
मारा अथवा मरा मरा
त्वरा करा रे त्वरा करा
घुम घुम घुम
उडवा बार
महाभयंकर मारामार

(काही कावळे घायाळ होतात. काही कबुतरे घायाळ होतात. तरीही मारामार चाललेली आहेच. एवढ्यात मोर येतो.)

**मोर :** मी मयूर झालो चिंतातुर
युद्ध थांबवा हो म्यॉओ म्यॉओ
फुकटच मरता का हो ? का हो ?
फोडितसे मी टाहो टाहो
म्याहो म्याहो म्याहो

पांढरा कावळा : उडवा याला ऽ ऽ ऽ
उखडून टाका चमकदार हा
गोल पिसारा ऽ ऽ

मोर : (संतप्त होतो. भयंकर नृत्य करतो)
म्याहो म्याहो म्याहो
कोण तुम्ही हो ?
कोण तुम्ही हो ?
कुणिहि असा कुणिहि असा
मीहि नव्हे हो असातसा
उगीच करता हो बचावचा
रे बगळ्यांनो याला ठेचा
मारा याच्या कुशीत चोचा
उगाच्च काय बकत्त जाय
ओळखत नाही आपली कुवत काय ?
कबुतरांनो रे काकांनो
युद्ध थांबवा तुम्ही अगोदर
समाचार रे घेऊ याचा
बगळ्यांनो रे मारा चोचा
यास अगोदर ठेचा ठेचा

(सगळे युद्ध थांबवतात. विव्हळत बाजूला उभे राहतात.)

मोर : राजहंसे मज पाठवले
न्यायदान त्याने केले
ते तुम्ही सगळ्यांनी का थांबवले ?
आता तरी नको उशीर पाजळून चोची खडकावर
अंगात खुपसा याच्या
म्याहो म्याहो म्याहो

म्हातारा कावळा : का मारता हो त्याला ?
म्हाताऱ्याचे ऐका थोडे
रक्त काढुनी त्याचे
काय मिळणार अपुल्याला ?

मोर : तुम्ही म्हातारे,
नमस्कार तुम्हां करतो
व्हाल का बाजूला हो ?
न्याय निष्ठुर मोठा असतो.

(म्हातारा कावळा हळहळत बाजूला जाऊन बसतो. ते बगळे पांढऱ्या कावळ्याला उचलून पुढे आणतात.)

मोर : रे रे हरामखोरा !
अजूनही ओरड खरे काय ते
संधी तुजला एकच देतो.
खरे सांग रे तू कोण ते

शुभ्र कावळा : (डोळे झाकून गप्प उभा राहतो.)
मुळीच्च नाही, मुळीच्च नाही
मी हिमालयातील असे कबुतर
याहून दुसरा कुणीच नाही
जय जय शंकर
जय जय शंकर
शंकर शंकर भोला

मोर : ठीक ठीक रे
खुपसा चोची खुपसा चोची
पुरता ठेचा

बगळा १ : कोकच्च्व् को ऽ ऽ

(कर्कश ओरडून त्याच्या पोटावर चोच मारतो. पोटातून रक्ताची धार फुटते, तरीही तो बोलत नाही.)

**बगळा २ :** कोकच्च् को ऽ ऽ

(कर्कश ओरडून त्याच्या उजव्या कुशीत चोच मारतो. कुशीतून रक्ताची धार फुटते, तरीही तो ओरडत नाही.)

**बगळा ३ :** कोकच्च् को ऽ ऽ

(कर्कश ओरडून त्याच्या डाव्या कुशीत चोच मारतो. कुशीतून रक्ताची धार फुटते, तरीही तो ओरडत नाही.)

**बगळा ४ :** कोकच्च् को ऽ ऽ ऽ

(त्याच्या डोक्यावर चोच मारतो. डोक्यातून रक्त येते. तरीही तो ओरडत नाही.)

**कावळे :** सफेत पक्षी लाल लाल
वा रे वा मजा मजा

**कबुतर :** लालम् लाल लालम् लाल
ओरड आता गुटुरंघुम गुटुरंघुम

**कावळे :** मजेदार हा दिसतो बेटा
ओरडत आता काव् काव् काव्

**मोर :** गप्प रहा हो
गप्प रहा हो
म्याहो म्याहो म्याहो
बोलत नाही म्हणजे काय ?
रे बगळ्यांनो,
खुपसा पुन्हा खुपसा चोचा
फुटेल याला नक्की वाचा

(बगळे चोची उगारून परत त्याच्या अंगावर धावतात.)

म्हातारा कावळा : मी आजोबा,
मी आजोबा,
थोडे थांबा
बोल आतातरि बोल रे !
तोंड तुझे तू खोल रे !
मरू नको तू फोल-रे
बोल अतातरि बोल बाबा,
बोल अतातरि बोल !
व्यर्थ असे हे खोटे खोटे
वेड नको तू पांघरू
तू तर इवले नाजुक नाजुक
पोर पाखरू ! पोर पाखरू !
बोल अतातरि बोल रे !
तोंड तुझे तू खोल रे !

शुभ्र कावळा : मुळिच्च नाही
मुळिच्च नाही
हिमालयातून आलो आहे
आनंदाने मरीन मी, मरीन मी
शंकर माझा स्वामी
शंकर माझा स्वामी
कसा ओरडू उगाच्च मी
उगाच्च मी
हव्या तेवढ्या खुपसा चोचा
हवे तेवढे मजला ठेचा
हिमालयातुन आलो मी
आलो मी

(थमळे त्वेषाने त्याच्यावर तुटून पडतात. पक्ष्यांचा मोठाच कलकलाट होतो. शुभ्र कावळ्याच्या अंगातून रक्ताच्या धारा फुटतात.)

कबुतरे : तुम्ही खुपसल्या अचूक चोची

कावळे : रंगपंचमी रक्ताची
रक्ताची

कावळे : या रे या कबूतरांनो या रे या !
तुम्ही नि आम्ही दोस्त मंडळी
रक्त पिऊ भरून ओंजळी

(सगळे बेहोष होऊन नाचतात आणि एवढ्यात खाली पडलेला पांढरा कावळा तडफडत 'काव काव काव' असे करुणपणे ओरडतो. सगळे गप्प होऊन ऐकतात.)

शुभ्र कावळा : काव, काव, काव, काव

कावळे : ऐका ऐका अखेर ठरला
हिमालयातील ढवळा ढवळा
शंभर टक्के पुरा कावळा

कावळा १ : हा अमुच्याशी
करून लबाडी
अमुच्याशी हा झूठ बोलला

कावळा २ : मारून मारून याला चोंची
फोडुन टाक् पुरती छाती

कावळा ३ : अमुचा असुनी अमुच्याशी हा
वैर धरुनिया येथे आला

कावळा ४ : दिली पाहिजे शिक्षा याला

(सगळे त्याच्यावर तुटून पडतात आणि नाचतनाचत निघून जातात.)

कबुतर १ : असून कावळा शंभर टक्के
स्वत:स म्हणतो कबुतर आहे.

कबुतर २ : याचे तोंडू लचके लचके

(सगळी कबुतरे त्याच्यावर त्वेषाने तुटुन पडतात आणि नाचत नाचत निघून जातात. त्यानंतर चोर आणि बगळेही 'कुकच्च को, म्याहो म्याहो' म्हणत निघून जातात.)

(रिकाम्या रंगमंचावर पांढरा कावळा घायाळ होऊन मरणोन्मुख अवस्थेत पडलेला आहे. मधूनच 'काव काव काव' ओरडतो खूप पाठीमागे थरथरत उभा असलेला म्हातारा कावळा पाणी घेऊन पुढे येतो. त्या घायाळ पाखरापाशी बसतो.)

**म्हातारा कावळा :**

फुकट् मेलास
फुकट् मेलास
अखेर तरी का बोललास
काव काव काव ?
हिमालयात राहून
काहीच कसे नाही शिकलास ?
नाही शिकलास
कसाही असलास
कसाही असलास
तरी तू हिमालयातून आला होतास.
आला होतास.
आमच्यापैकी होतास
तू एक कावळा
तुला टाकीत नाही मी उघड्यावर
घेतो मी तुला माझ्या म्हाताऱ्या
खांद्यावर
तुला मानाची मुठमाती देतो
मुठमाती देतो.

(त्याला उचलून चालताचालता)

कसाही असलास
तरी हिमालयातून आला होतास,
पांढरा असलास तरी कावळा होतास
कावळा होतास.

— पडदा —



**माधव साखरवांडे**

(काळोकुट्ट रात्र, गयाण, एकाकी, रातकिड्यांचे मधूनच आवाज, कुत्र्याचे भुंकणे, मांजरांची झटापट, लोकांचे हासण्याचे आवाज, एक छोटा मुलगा अंधारात धाचपडत पुढे पुढे येतो. त्याच्याच मागून एका स्त्रीचा आवाज. स्त्री दिसत नाही.)

**आवाज** : हं चल पुढे –

**मुलगा** : हो पण पुढे कुठे ? मला तर इथे काहीच दिसत नाही.

**आवाज** : दिसायला कशाला हवं ? मी आहे ना ?

**मुलगा** : तू तरी कुठे दिसत्येस –

**आवाज** : मी दिसण्याचं कारणच नाही तुला.

(इतक्यात अंधारातून एक छोटा मनुष्य पुढे येतो. त्याच्या हातात असलेली वस्तु तो झटकन् लपवितो.)

**मनुष्य** : कोण दिसायला हवंय तुला ?

**मुलगा** : म. . . म. . . मी. . . तू. . . तुम्ही

**मनुष्य** : म. . . म. . . त. . . त काय करतोयेस ? नीट नाही का बोलता येत ?

**मुलगा** : अहो पण रागावता का असे ? मी काय केलंय तुमचं ?

**मनुष्य** : मग मला हळूच पाहून पोलिसांना कळवणार होतास ना ? मला ठाऊक आहे.

मुलगा : पोलिसांना नाव कळवायला तू काय चोर आहेस थोडाच ?

मनुष्य : मग ? आता कसं बरोबर ओळखलंस ?

मुलगा : तुम्ही चोर आहात ?

मनुष्य : मग तुला काय वाटलं ? तुझा मास्तर आहे म्हणून ?

मुलगा : पण तुम्ही चोरासारखे कुठे दिसता ?

मनुष्य : म्हणजे ?

मुलगा : तुम्ही मोठया डोळयांचे – काळा बुरखा घेतलेल्या राक्षसासारखे कुठे दिसता ?

मनुष्य : (हसून) अस्स होय ?

मुलगा : खरं की नाही ?

मनुष्य : हो.

मुलगा : का हो चोरकाका, मग तुम्ही चोर कसे ?

मनुष्य : (उमनं हसून) खरं आहे. मी कुठं आहे चोर ?

मुलगा : मग तुम्ही मला मघाशी फसवलंत की नाही ?

मनुष्य : तुला फसवणं फार सोपं आहे पोरा ! फक्त पोटाला फसवता नाही येत रे.

मुलगा : तुम्ही रडता चोरकाका ? आमचा मास्तरांनी आम्हाला एका चोराची गोष्ट सांगितली. त्यातला चोर गावातल्या सगळया माणसांना रडवतो.

मनुष्य : खरं आहे. मी तरी कुठं वेगळा आहे त्याच्यापेक्षा ?

मुलगा : तुम्हीपण चोरी करता ? चोरी करणं पाप आहे ना ? तुम्हाला नाही शिकवलं तुमच्या आईबाबानी ?

मनुष्य : तुझ्यासारखाच घरी एक गोड मुलगा आहे मला.

मुलगा : मग तुम्ही त्याला झोपवताना गोष्ट नाही सांगत ? माझे बाबा





मला झोपवताना रोज नवी गोष्ट सांगतात. आई गाणे म्हणते. (मनुष्य जाऊ लागतो.) घरी जाता ना तुम्ही चोरकाका? तुमची वाट पहात असेल तुमचा बाळ.

**मनुष्य** : हो तिथेच चाललोय बेटा घरीच.

(जातो. जाताना मुलाचे दोन गालगुच्चे घेतो. आणि चोरून आणलेली सोन्याची माळ त्याच्या गळ्यात घालतो. आणि भराभर जातो.)

**मुलगा** : (त्याच्या मागे धावत जाऊ लागतो.) अहो चोरकाका अहो चोर-काका, अहो ही सोन्याची माळ राह्यली पहा.

(इतक्यात हातात कुऱ्हाड आणि गळ्यात बंदूक असलेले दोन दरोडेखोर येतात.)

**दरोडेखोर** : (त्याच्या हातातली माळ हिसकावून घेत) आन् ती हिकडं. कुनाला हाका मारतुयास र पोरा?

**मुलगा** : (भेदरतो) त – त – तुम्ही कोण?

**दरोडेखोर** : का रं! लई टरकलायस की! आनं मगा धावत हुतास त्येका त्येच्यामागं?





मुलगा : अहो ते चोरकाका गेले ना, त्यांची माळ राह्यली

बरोबेखोर : ह्यात् ल्येका ! चोरकाका म्हणतो आन् ही माळ राह्यली म्हणतो, अरं काय येडं की खुळं ? आरं चोर एकदा आपुन सवता न्हाईल चुकुन पर चोरलेला माल कदी ठेवणार न्हाई मागं –

मुलगा : अहो पण त्यांनी चोरलेली नाही ती. त्यांच्या बाळाची आहे ती. पण तुम्ही कोण ?

बरोबेखोर : आम्ही हरिश्चंद्राच्या मालकाच्या कुळांतली.

मुलगा : हरिश्चंद्र तर राजा होता. मग त्याचा मालक कोण ?

बरोबेखोर : ह्यात् ल्येका, आरं मांग –

मुलगा : मांग ?

बरोबेखोर : म्हणजे हरिश्चंद्र जवा समशानांत लाकडं फोडत म्हता, तवा त्येचा मालक येक मांग व्हता.

मुलगा : हां हां. म्हणजे माणसांची डोकी कापणारा नाही का ?

बरोबेखोर : आत्ता कसं बराबर वळखलंस ?

मुलगा : म्हणजे तुम्ही तुम्ही माणसांची –

**दरोडेखोर** : मुंडकी छाटनारं –

**मुलगा** : पण मांगकाका तुम्ही मला –

**दरोडेखोर** : काय ?

**मुलगा** : माझं डोकं कापणार ?

**दरोडेखोर** : (मोठ्याने हसतो.) तुजं मुंडकं उतरून काय मिळणारं ?

**मुलगा** : पण मुंडकं कापून काय मिळतं हो तुम्हाला मांगकाका ?

**दरोडेखोर** : पैसं –

**मुलगा** : पण त्यांचा पैसा घेऊन त्यांनाच मारायचं ?

**दरोडेखोर** : मग आम्हीच मरायचं व्हयं ?

**मुलगा** : पण लोकांचा पैसा, वस्तू घेणं हे पाप आहे ना ?

**दरोडेखोर** : (मोठ्याने हंसतो.) पाप व्हय पाप. आन् ज्येच्यापाशी आमच्या मुंड्या पिरगाळून पैसा हाये, त्यो लई पुन्यवान. (हसतो.)

**मुलगा** : अहो हसताय काय असे मांगकाका ? मला भीती वाटते तुमची.

**दरोडेखोर** : हसू नको तर काय रडू ? तू लई बच्चा हायेस आजून. तुला कळायचं न्हाई. मोठ्ठा हो आन् मग बोल.

**मुलगा** : म्हणजे मोठा झालो म्हणजे पुन्हा तुम्ही मला भेटणार ?

**दरोडेखोर** : व्हय – (जाऊ लागतात.)

**मुलगा** : (हातांतली सांखळी पाहून) अहो अहो मांगकाका तुम्ही सांखळी घेऊन जाणार होताना ?

**दरोडेखोर** : (लांबून) येईन कवा तरी. आता नगं–

(मुलगा विचारात पडतो. इतक्यात त्याला कोणीतरी गाणं म्हणत असल्याचा आवाज येतो )

**मुलगा** : ह्यावेळी कोण गाणं गातंय ? कोणीतरी बाळाला झोपवते – अहो, अहो –

**कवि :** काय रे ! वाट चुकलास की काय ? तू इथे कसा ?

**मुलगा :** तुम्ही पण वाट चुकलांत ?

**कवि :** नाही.

**मुलगा :** मग तुम्ही इथे कसे ?

**कवि :** फार हुशार दिसतोस तू ! तूच सांग पाहू ?

**मुलगा :** सांगू ?

**कवि :** सांग ना.

**मुलगा :** तुम्ही बाळाला झोपवत होता ना ?

**कवि :** कशावरून ?

**मुलगा :** तुम्ही गाणे म्हणत होता म्हणून –

**कवि :** म्हणजे ?

**मुलगा :** मी झोपताना माझी आई असंच गाणं म्हणते.

**कवि :** आणि बाबा ?

**मुलगा :** बाबा गोष्ट सांगतात. एकदा गंमत झाली.

**कवि :** काय झालं रे ?

**मुलगा :** एकदा की नाही आई लागली गोष्ट सांगायला आणि मला लागली झोप. आईची गोष्ट संपल्यावर बाबांनी गाणं म्हणायला सुरुवात केली आणि मी घाबरून उठून बसलो. तेव्हापासून बाबा फक्त गोष्टच सांगतात.

(कवि हसायला लागतो.)

**कवि :** आणि आता मी गायला लागलो की पळून जाशील. हो की नाही ? मला थांबलं पाहिजे.

**मुलगा :** पण तुमचा आवाज आमच्या बाबांसारखा कुठे आहे ? तुमचा आवाज किती छान आहे. तुमच्या बाळाला तुम्ही गाणे गाऊन झोपवता ?

**कवि :** मला एकच बाळ नाही. खूप बाळं आहेत मला.

**मुलगा :** मग तुमचं घर खूप मोठ्ठ असेल नाही ?

**कवि :** खूप मोठ्ठ.

**मुलगा :** कित्ती मोठ्ठ ? (हात दाखवतो) एवढं एवढं ? (प्रत्येक वेळेस कवि नकार देतो) आम्ही नाही जा.

**कवि :** एक स्वारी रुसली. गालातल्या गालात फुगली (गुदगुल्या करतो) आणि खुदकन् हसली.

**मुलगा :** मग सांगाना तुमचं घर केवढं मोठं आहे ते ? ह्या जगाएवढं ?

**कवि :** बरोबर. आत्ता कसं ओळखलंस ?

**मुलगा :** तुमचं घर जगाएवढं. मग तुमचं जग केवढं मोठ्ठ असेल नाही ?

**कवि :** फार हुशार मुलगा आहेस तू एवढा लहान आहेतस. म्हणूनच इतकं छान बोलतोस. मोठा झाल्यावर –

**मुलगा :** मोठा झाल्यावर काय ?

**कवि :** इतकं गोड – छान बोलशीलच असं नाही.

**मुलगा :** पण आत्ता भेटलेले काका म्हणत होते की तू लहान आहेस अजून तुला काही कळत नाही – म्हणजे मला.

**कवि :** कोण काका हा ?

**मुलगा :** मांग – मांग काका –

**कवि :** मांग ? अस्सं म्हणजे दरोडेखोर भेटला होता होय ? तुला काही इजाबिजा तर केली नाही ? तुझ्याजवळचं काही पळवून तर नेलं नाही ना ?

**मुलगा :** अहो पळवून तर नाहीच, पण मी हे देत होतो (साखळी दाखवितो) तरी घेतले नाही.

**कवि :** दरोडेखोराने साखळी घेतली नाही ?

**मुलगा :** का ? तुम्हाला आश्चर्य वाटलं ?

**कवि** : मला, मला स्फूर्ति आली. काव्याचा एक नवा विषय सुचला (गायला सुरुवात करतो. मुला बरोबर हात धरून नाचतो.)

(दोघेही गाणे गात गात एका दुसऱ्या प्रदेशात येतात. मुलगा हळुहळू झोपी जातो. आणि कवि त्याच्या अंगावर आपली शाल पांघरून स्वत:त निघून जातो.)

(थोड्या वेळाने सर्कशीतला एक विदूषक उदासीन, रडवेल्या अशा अवस्थेत येतो. त्याला जवळच पडलेली सोन्याची माळ दिसते. खूप आनंद होतो आणि त्या भरात निरनिराळ्या प्राण्यांचे आवाज काढू लागतो. नंतर स्वत:शीच बोलू लागतो. मुलगा हळुहळू जागा होऊन ऐकतो.)

**विदूषक** : आता त्या मालकानं हाकललं त्याची चिंता नाही. पुढल्या काही काही दिवसांची तरी तजवीज झाली. तरी मला वाटलंच होतं. देव काही इतका निष्ठूर नाही. माझ्या बाळाची त्याला दया येणारच. मालकानं आज मला सांगितल्यावर मला अगदी रडू आवरेना. सर्कशीतल्या खेळात लहान मुलांपासून तो थेट म्हाताऱ्यापर्यंत सर्व लोकांना पोट दुखेपर्यंत हंसविणारा मी – आज आतापर्यंत रडत होतो. विश्वास बसेल कोणाचा ? पण आता मालकाला तोंडावर सांगेन मी –

**मुलगा** : की मला तुझी नोकरी आजपासून नको म्हणून –

**विदूषक** : तुला कसं कळलं माझी नोकरी गेली म्हणून –

**मुलगा** : मी तुम्हाला सर्कशीत खूप हँसवतांना आणि हसतांना पाह्यलंय म्हणून–

**विदूषक** : मग त्याचा काय संबंध ?

**मुलगा** : वा हो वा. विदुषककाका, तुम्हाला माहीत नाही वाटतं –

**विदूषक** : आम्हाला काय बुवा माहीत तुम्हाला माहीत आहे ते ?

**मुलगा** : हे पहा, पुन्हा हंसायला लागलात तुम्ही –

**विदूषक** : अरे तो तर माझा धंदाच आहे.

**मुलगा** : मग मघाशी तुम्ही रडत का होता ?

**विदूषक** : तुला कसं कळलं मी रडत होतो ते ?



**मुलगा :** आम्हाला माहीत आहे. आमच्या आईनी सांगितलंय आम्हाला. ती जमाडीजम्मत आहे.

**विदूषक :** मग आम्हाला सांगा की तुमची लबाडीलब्बड.

**मुलगा :** लबाडीलब्बड नाही काही – जमाडीजम्मत.

**विदूषक :** गमाडीगम्मत.

**मुलगा :** सांगू ? पण तुमच्या आईने तुम्हाला कधी सांगितली नाही ?

**विदूषक :** नाही बुवा. आमची आई आम्हाला धमाडीधम्मत सांगायची – आमच्या पाठीवर. सांगा –

**मुलगा :** (मुलगा हसतो) आमची आई आम्हाला म्हणते फार हसू नये – मग रडायला होतं.

**विदूषक :** छट् – आम्ही कधीच रडत नाही.

**मुलगा :** मग मघाशी रडत होता ते ?

**विदूषक :** एका मुलाला फसवलं. आम्ही जमाडीजम्मत केली एका मुलाची.

**मुलगा :** तुमच्या बाळाची पण तुम्ही अशीच जमाडीजम्मत करीत असाल नाही झोपतांना ?

**विदूषक** : बाळ झोपतांना मी घरी नसतोच.

**मुलगा** : मग बाळाला कोण झोपवतं ?

**विदूषक** : आमची एक जमाडीजम्मत आहे.

**मुलगा** : सांगा ना –

**विदूषक** : आम्ही नाही जा –

**मुलगा** : सांगा ना हो काका –

**विदूषक** : एका अटीवर

**मुलगा** : कबूल

**विदूषक** : कोणाला सांगायचं नाही.

**मुलगा** : नाही.

**विदूषक** : त्याला गोष्ट सांगावी लागत नाही तो आपोआप झोपतो.

**मुलगा** : त्याची आई गाणं म्हणत नाही ?

**विदूषक** : तिचं गाणं त्याला ऐकू येत नाही.

**मुलगा** : कां ?

**विदूषक** : फार लांब राहते ती.



**मुलगा :** कुठे ?

**विदूषक :** (आकाशाकडे बोट दाखवून) तिथे.

**मुलगा :** आणि तरी तो बाळ आपोआप झोपतो ?

**विदूषक :** हो ना.

**मुलगा :** कसा ?

**विदूषक :** मी सर्कशीला जातांना त्याला एक गोळी देतो –

**मुलगा :** मला पण आई गोळी देते. पण मला तिने झोप येत नाही तो.

**विदूषक :** ही निराळी गोळी असते, तिला 'अफू' म्हणतात.

**मुलगा :** (मोठ्याने) 'अफू' –

**विदूषक :** (त्याच्या तोंडावर हात ठेवतो) बघ लागलास मोठ्याने बोलायला.

**मुलगा :** पण अफू खाणं वाईट असतं ना ?

**विदूषक :** हो, पण आम्हाला नाही.

**मुलगा :** कां ?

**विदूषक :** कारण त्यामुळे त्याचं पोट भरतं आणि आमचंही.

**मुलगा :** अफूनं पोट कसं भरतं ?

**विदूषक :** अरे तो जर झोपला नाही तर मला कामावर जाता येणार नाही. आणि मी कामावर गेलो नाही तर मालक मला पैसे देणार नाही. आज आम्ही आमच्या काळासाठी एक जम्मत आणलीय.

**मुलगा :** काय आहे ?

**विदूषक :** ओळख पाहू ?

**मुलगा :** सर्कशीतला वाघ –

**विदूषक :** वाघ म्हणजे काय जम्मत आहे काय ?

**मुलगा :** मग हत्ती ?

**विदूषक :** हत्ती माझ्या खिशांत राहील काय ?

**मुलगा** : मग तुम्हीच सांगा.

**विदूषक** : हरलास ?

**मुलगा** : हो.

**विदूषक** : दुसऱ्यांदा हरलास ?

**मुलगा** : हो-हो-हो-१७६० दा हरलो बस्स ?

**विदूषक** : मग डोळे झाक.

**मुलगा** : झाकले.

**विदूषक** : कुठे झाकले ? उघडेच आहेत.

**मुलगा** : हे कोण झाकले.

**विदूषक** : छट् उघडेच आहेत की.

**मुलगा** : हे काय हो काका ? आम्ही नाही जा.

**विदूषक** : अंह मिटलेयत ते. झाकले नाहीत. खरं की नाही ? (हंसतो)

**मुलगा** : हो आम्ही हरलो. पण तुमची गंमत दाखवा ना ?

**विदूषक** : आव मंतर जाव मंतर काली कलकत्तेवाली महाकाली. हमारे हातमें सोनेकी चेन.

(हात उघडून दाखवतो. सोन्याची साखळी. मुलगा दचकतो. आपले हात आणि आजुबाजूला पाहतो.)

**विदूषक** : काय पाहतोस ? काही हरवलंय ?

**मुलगा** : (चाचरत) हो-ना-नाही. काही नाही.

**विदूषक** : नक्कीच हरवलंय. सांग काय ते ?

**मुलगा** : काही नाही.

**विदूषक** : ही साखळी कोणाची ?

**मुलगा** : माझी-नाही-तुम्ही तुमच्या बाळासाठी आणलीत ना ?

**विदूषक** : मी ? ना-नाही -

**मुलगा :** असं काय करता विदूषक काका. तुम्ही तुमच्या बाळासाठी ही जमाडीजम्मत आणलीय ना ?

**विदूषक :** मी ? हॅट. मी तुझीच गंमत केली. एक मुलगा फसला विदूषकावर रुसला. काकाने खाल्ली गोळी – पुतण्याच्या हातात सोन्याची साखळी. (त्याच्या हातात सोन्याची साखळी घालून चालू लागतो.)

**मुलगा :** काका – काका (विदूषक पक्षांचे आवाज काढीत निघून जातो.) अहो विदूषक काका – ही सांखळी घेऊन जा –

(दुसऱ्या बाजूने एक दारुड्या येतो. त्याला आपला तोल सावरत नाही. त्याच्या मागून त्याच्या बाहीला फरफटत त्याचा मुलगा येतो.)

**छोकरा :** बाबा चला ना घरी लौकर.

**दारुड्या :** तू कोण ? मी हवा तेव्हा जाईन घरी - जाव –

**छोकरा :** बाबा घरी आई वाट पाहतेय तुमची.

**दारुड्या :** कोणी वाट पहात नाही.

**मुलगा :** अहो खरंच वाट पहात असेल.

**दारुड्या :** तू कोण ? तुला काय माहीत ?

**मुलगा :** माझी आई सुद्धा बाबांची वाट पहाते –

**छोकरा :** तुझे बाबा इतक्या रात्री घरी येतात ?

**मुलगा :** अहं माझे बाबा किनई संध्याकाळी घरी येतात आणि येताना खाऊ आणतात.

**छोकरा :** कसला खाऊ आणतात ?

**मुलगा :** मला गुलाबजांब आवडतात म्हणून ते आणतात, तर कधी कॅडबरी– तुला ?

**छोकरा :** आणतात ना ?

**मुलगा :** असे काय करतात रे तुझे बाबा ?

**छोकरा :** त्यांना बरं नाही वाटत –

**मुलगा** : ताप आलाय ?

**छोकरा** : हो.

**दारुड्या** : कोणाला ताप आलाय ?

**छोकरा** : कोणाला नाही. तुम्ही घरी चला अगोदर.

**मुलगा** : अरे त्यांना चालवत नसेल तर कशाला करतोस घाई. त्यांना औषध द्यायला हवं.

**दारुड्या** : कोणाला औषध ?

**मुलगा** : तुम्हाला बरं वाटत नाही ना म्हणून –

**दारुड्या** : कोण म्हणतं ? आणखी चांगल्या दोन बाटल्या प्यायलो असतो.

**मुलगा** : काय प्यायलो असतो म्हणताहेत ?

**छोकरा** : काही नाही.

**दारुड्या** : काही नाही कसं ? दारू.

**मुलगा** : दारू ? तुम्ही दारू पिता ?

**दारुड्या** : मग ? दारू म्हणजे अमृत आहे अमृत !

**मुलगा** : शी: किती घाण येते दारूला. आणि देव अमृत पितात. दारू राक्षस !

**दारुड्या** : कोण म्हणतं ?

**मुलगा** : माझे बाबा सांगतात मला नेहमी देवांच्या आणि राक्षसांच्या गोष्टी. दारू पिणं वाईट.

**दारुड्या** : तुझा बाप दारू पीत नाही ?

**मुलगा** : शी :

**छोकरा** : किती चांगले आहेत रे तुझे बाबा.

**दारुड्या** : त्याचा बाप चांगला काय – (त्याला मारतो).

**मुलगा** : कशाला हो मारता त्याला ! माझे बाबा खरंच चांगले आहेत.

झोपवताना मला ते गोष्टी सांगतात.

**छोकरा** : आणि हे आम्हाला झोपेतून उठवून मारतात. आईला – मला –

**बारुड्या** : मग बाप आहे मी तुझा ? जीवसुद्धा घेईन तुमचा.

**मुलगा** : खरंच का ते जीव घेतील तुमचा ?

**छोकरा** : घेतला तर बरं होईल, एकदा – उपास काढण्यापेक्षा –

**मुलगा** : तुम्ही उपाशी राहता कां ? (छोकरा बापाकडे बोट दाखवितो.)

**मुलगा** : काहो तुम्ही त्यांना जेवू देत नाही ?

**बारुड्या** : कोण म्हणतो ? जेवण्यापेक्षा दारू प्या.

**छोकरा** : बाबा चला ना लौकर.

(मुलगा सोन्याची साखळी त्याच्या हातात देतो. छोकरा चकित होतो. परंतु ती परत करतो.)

**मुलगा** : कारे ?

**छोकरा** : नको. माझी आई मारील मला.

**मुलगा** : का ?

**छोकरा** : तिला वाटेल मी कोणाची चोरून आणली.

**मुलगा** : पण आईला सांग मी दिली म्हणून.

**छोकरा** : नको आईला सांगून खरं नाही वाटणार.

**मुलगा** : मग बाबांच्याकडे ठेव.

**छोकरा** : मुळीच नको. ते खर्च करून टाकतील. तू कित्ती छान मुलगा आहेस. तुझे आईबाबा किती प्रेमळ आहेत. ही घे तुझ्याचकडे ठेव –

**बारुड्या** : काय चाललंय – काय देतोयस त्याला ?

**छोकरा** : काही नाही – तुमची वाट पहात्येय आई चला.

**बारुड्या** : कोणी वाट पहात नाही –

(दोघेही धडपडत जातात. दुसऱ्या बाजूने कुजबूज ऐकू येते. दोघे तिथे आडदांड लोक आणि एक सभ्य दिसणारा गृहस्थ हळू हलक्या आवाजात बोलत येतात. मुलगा त्यांना ऐकतो. झाडामागे लपतो.)

**स. गृ.** : काहीही करून त्याचा काटा काढा.

**१ आडदांड** : तुम्ही निर्धास्त रहा राव.

**२ आडदांड** : आम्ही व्यवस्थित करतो बघा ते काम.

**स. गृ.** : आमची सगळी बिंग बाहेर फोडतो तो.

**१ आडदांड** : आपुन त्येचं थोबाड फोडू बघा.

**स. गृ.** : अरे हळू बोला. इथं भितीना सुद्धा कान असतात.

**१ आडदांड** : हितं कुठं भिंती असतात.

**२ आडदांड** : हितं समदी झाडं.

**स. गृ.** : हल्ली झाडांना सुद्धा कान असतात बरं.

**१ आडदांड** : असत्याल तर उपटून घेऊ त्येंच्या हातात, फुडं बोला.

**स. गृ.** : पुढे काय ? एक घाव दोन तुकडे.

**१ आडदांड** : फुकट बसत्यात न्हव घाव. त्येला वजन भी तसंच लागतंय.

**स. गृ.** : समजलो – हे बघ (दोन बोटे दाखवून) एवढे देईन.

**२ आडदांड** : येवढ्यानं काय होतंय राव. उद्या पोलिसात वर्दी गेली आः
आम्ही गावलो म्हंज तुम्ही शाप हात वर करून मोकळं व्हाल.

**१ आडदांड** : आन् आमचं ह्ये (गळ्यावरून हात फिरवतो.)

**स. गृ.** : मग किती घेणार बोला !

**१ आडदांड** : (पांच बोट दाखवितो)

**स. गृ.** : हे म्हणजे फार झाले. तुम्ही आमच्या पोटावरच मारता आहात.

**आडदांड** : साहेब परवाच्या काळ्याबाजारात चाळीसलाख रुपये गावले होते ?

**स. गृ. :** शू: त्यातले एक लाख त्या अनाथबालकाश्रमाला आणि दोन लाख बालाजीच्या मंदिराला नाही का दिले ?

**१ आडदांड :** आन् आम्हाला येवढं पाच विसा द्याया जीव तुटाया लागला न्हवं तुमचा ?

**२ आडदांड :** आता आणि एक सोन्याचं कडं मिळाल्याविगर तुम्हाला हितनं जाया मिळणार नाही.

**स. गृ. :** कोणाशी गाठ आहे माहीत आहे ना ?

**१ आडदांड :** आहो आसं मेलं काय आन फासावर चढलं काय, सारखंच. पर येकाचा काटा काढल्याचं तरी समाधान मिळंल.

**२ आडदांड :** हं बोला ही फरशी सकाळीच पराजलिया न्हवं.

**स. गृ. :** अरे पण,

**आडदांड :** अरं न्हाई आन् कारं न्हाई.

**स. गृ. :** मी मोठ्याने ओरडेन.

**आडदांड :** बोंबल हवं तेवढं. कोणी ऐकणारं न्हाई (मुलगा झाडाबाहेर येतो.)

**मुलगा :** अहो त्यांना नका मारू.

**आडदांड :** तू रं कोन ? आमच्या मागं मागं कशापायी आलास ?

**मुलगा :** मी इथेच होतो. पण तुम्ही ह्यांना का मारणार होता ? त्यांना नका मारू.

**आडदांड :** कारे बाबा ?

**मुलगा :** त्यांच्या घरी त्यांचा बाळ त्यांची वाट पहात असेल. मी कशी माझ्या बाबांची पहातो ?

**स. गृ. :** ऐका त्याचं तरी ऐका.

**आडदांड :** ऐका, काय ऐका ? तुझं प्वार वाट बघतंय आन् ज्याचा काटा काढणार व्हतास त्याचं रं. आ. आता का थोबाड मिटलं बोल ?

**मुलगा :** असं काय करता, सोडून द्या ना त्यांना ?

**आडदांड** : अंहं (टिचक्या वाजवून) ह्ये मिळल्या बिगर न्हाई.

(मुलगा हळूहळू आपली सोन्याची साखळी चाचपतो. आणि पुढे करतो.)

**मुलगा** : हं ही घ्या. पण त्यांना सोडा. त्यांना नका मारू. (आडदांड चकित होतात.)

**स. गृ.** : हं घ्या ती आणि जा एकदा.

**आडदांड** : वा: आरं हायेस कोन तू ? मांगसुद्धा ह्ये काम करणार न्हाई. ह्या कवळ्या हातातली साखळी घ्यायां सांगतोस. हायेस कोन तू. ह्येच्यापायी सुटलास आज तू – जा पोरा लई मोठ्ठा व्हनार बघ तू. अशीच बुद्धी ठीव रं राजा (जातात.)

**मुलगा** : अहो पण ही साखळी ? ही घ्या ना ?

**आडदांड** : आमची आठवण म्हून तुझ्यापाशी ठीव.

**मुलगा** : (स्वत:) ही साखळी कोणी घेतच नाही. आता तर मला झोप यायला लागली.

(जांभया देतो आणि तिथेच पडून झोपतो)

(थोड्या वेळाने कागदाचा कुरकुरू आवाज येतो. मुलगा हळूहळू डोळे उघडतो. एक वृद्ध गृहस्थ कचऱ्याचा ढीग चिवडताना दिसतो.)

**मुलगा** : अहो आजोबा, अहो आजोबा –

**वृद्ध** : कुठून येतोय हा आवाज ? नक्कीच ह्या शेजारच्या ढिगाऱ्यातून (उपसतो.)

**मुलगा** : अहो तिकडे काय पहाताय आजोबा ? मी इथे आहे.

**वृद्ध** : कुठे रे ?

**मुलगा** : इथे ह्या झाडाखाली (वृद्ध त्याच्याजवळ जातो.)

**वृद्ध** : इथे काय करतो आहेस ह्यावेळी ?

**मुलगा** : काही नाही. झोपलो होतो, आता उठलो.

**वृद्ध** : एवढ्या रात्री एकटाच आलास ?

**मुलगा** : हो. पण मी एकटाच नाही.

**वृद्ध** : मग कोण आहे तुझ्याबरोबर? दिसत तर नाही इथे कोणी?

**मुलगा** : ते माणूस दिसतच नाही कोणाला.

**वृद्ध** : अरे वा, मोठा गमतीदार दिसतोस तू –

**मुलगा** : पण काय हो आजोबा, तुम्ही ह्या कचऱ्याच्या ढिगात काय शोधता हो? आमच्या घराशेजारी एक माणूस नेहमी असाच ढीग शोधतो पण तो वेडा आहे.

**वृद्ध** : मी या कचऱ्याचा ढिगांत झोपलेली बाळे शोधतोय.

**मुलगा** : तिथे का झोपतात ती?

**वृद्ध** : थंडी लागते म्हणून. कचऱ्याचा ढिगात त्यांना ऊब मिळते.

**मुलगा** : मग तुम्ही त्यांना कुठे नेता?

**वृद्ध** : त्यांच्या घरी.

**मुलगा** : त्यांचं घर आहे?

**वृद्ध** : अशा सर्व मुलांसाठी एक घर केलं आहे.

**मुलगा** : कोणी?

**वृद्ध** : कोणी असं तुला वाटतं?

**मुलगा** : तुम्ही?

**वृद्ध** : हो...

**मुलगा** : आजोबा तुम्ही कित्ती छान आहात हो. त्यांना तुम्ही गोष्टी सांगता?

**वृद्ध** : हो.

**मुलगा** : माझ्या आईसारखं गाणं म्हणता?

**वृद्ध** : हो. चल तुला गोष्ट सांगतो आणि गाणंही म्हणून दाखवतो.

**मुलगा** : कुठे?

**वृद्ध** : ह्या मुलांच्या घरी.

**मुलगा** : एवढ्या मुलांना तुम्ही खाऊ घालता?

**वृद्ध** : हो.

मुलगा : तुम्ही खूप श्रीमंत असाल नाही, आजोबा ?

वृद्ध : हो.

मुलगा : मग तुमचे कपडे फाटके कसे ?

वृद्ध : अरे पैशाच्या ओझ्याने फाटले.

मुलगा : खोटं.

वृद्ध : बरं तर, मी नसलो श्रीमंत तरी आजूबाजूचे लोक आहेत ना ?

मुलगा : ते काय करतात ?

वृद्ध : मदत करतात पैशाची.

मुलगा : आजोबा ?

वृद्ध : हं.

मुलगा : मी पण करणार.

वृद्ध : काय ?

मुलगा : मदत.

वृद्ध : अरे वा !

मुलगा : आजोबा डोळे मिटा.

वृद्ध : अरे इतक्यातच डोळे मिटायला सांगतोस ?

मुलगा : असं काय हो आजोबा – मिटा ना –

वृद्ध : बरं बुवा. हे मिटले. (डोळे मिटतो)

मुलगा : (खिशातली साखळी त्यांच्या खिशात ठेवतो.)

वृद्ध : अरे किती वेळ मिटायचे रे –

मुलगा : उघडा आता.

वृद्ध : काय केलीस जादू ?

मुलगा : आम्हाला काय माहीत तुमच्याकडे आहे ती.

वृद्ध : माझ्याकडे ?

मुलगा : तुमच्या खिशात.

(वृद्ध साखळी हातात घेतो. मुलाकडे पाहतो. दोन थेंब साखळीवर पडतात.)

**मुलगा** : माझी साखळी आवडली नाही ?

**वृद्ध** : खूप आवडली.

**मुलगा** : खोटं. नाहीतर तुम्ही रडला नसता.

**वृद्ध** : मी रडलो नाही. हे आनंदाश्रू आहेत जास्त सुखसुद्धा माणसाला पेलत नाही. फार मोठा आहेस तू बाळ. (त्याच्या हातात साखळी परत देत.)

**मुलगा** : मग तुम्ही मला ही परत का देता ?

**वृद्ध** : मला साखळी नको. तू हवा आहेस. तुझं मन हवं आहे.

**मुलगा** : तुम्ही काय बोलता मला कळत नाही आजोबा.

**वृद्ध** : तू मोठा झालास की पुन्हा येईन तुझ्याकडे.

**मुलगा** : साखळी मागायला ?

**वृद्ध** : नाही, दुसरं काहीतरी.

**मुलगा** : काय ?

**वृद्ध** : आत्ता नाही. तेव्हाच सांगेन.

(त्याच्या पाठीवरून हात फिरवीत निघून जातो.)

**मुलगा** : आजोबा आजोबा मला घेऊन जा ना ?

(पुन्हा स्त्रीचा आवाज त्याला ऐकू येतो.)

**आवाज** : कुठे चाललास त्यांच्यामागे ?

**मुलगा** : आजोबांच्या शाळेत.

**आवाज** : वेळ आहे अजून जायला तिथे

**मुलगा** : का ?

**आवाज** : मोठा झालास म्हणजे जा. रात्रभर भटकत राहिलास तर आई नाही शोधणार तुला ?

**मुलगा** : आई कुठे आहे माझी ?

**आवाज** : चल आता माझ्या मागोमाग — पहाट होत चाललीय.

**मुलगा** : (खिशातली माळ घेतो) अरे ही सोन्याची साखळी ओली कशी झाली.

**आवाज** : दंवाचे थेंब आहेत ते.

**मुलगा** : दंवाचे थेंब ? रात्री नाही लागले ते ?

**आवाज** : तुझ्या हातातल्या माळेत होते ते.

**मुलगा** : कसली माळ.

**आवाज** : अश्रूंची.

**मुलगा** : कोण रडत होतं. कोणाचे अश्रू ?

**आवाज** : मघाशी तुला कोण कोण भेटलं होतं ?

**मुलगा** : खूप जणं –

**आवाज** : त्यांचे आणि त्यांना पाहून देवांचे.

**मुलगा** : खरं – मी कालच आईला विचारलं. तर आई म्हणत होती की जगातली चांगली आणि वाईट कामं देव आपल्या रोजनिशीत टिपून ठेवतो आणि टिपताना त्याच्या डोळ्यांतून अश्रू गळतात ते दंवाचे थेंब बनून त्यांना झाडे अलगद आपल्या अंगावर झेलतात आणि टवटवीत होतात. खरं का हो –

**आवाज** : हो.

**मुलगा** : आता मी आईला सगळं जाऊन सांगेन आणि बाबांना पण – आई – ग – आई –

(हळुहळू प्रकाश – आणि पडदाहो)





# पंपू आजारी आहे

## दिलीप प्रभावळकर

(पडदा उघडतो तेव्हा एका लहानशा कॉटवर झोपलेला पंपू प्रेक्षकांना दिसतो. कपाळावर पांढऱ्या रुमालाची घडी. पांघरुण छातीपर्यंत ओढलेले. खोलीत दोनतीन खुर्च्या. कॉटजवळ एक स्टूल, बाजूला एखादे टीपॉय इ. पंपू डोळे मिटून पडला आहे. बाजूच्या स्टूलावर औषधांची बाटली. फळे ठेवलेली बशी. चांदीमधे गुंडाळलेली चॉकलेटं कॉटवर बाजूला कापडी कुत्रा. रंगीत पुस्तके. इतर काही खेळ. उजवीकडून बाळ्या व नन्या येतात. शाळेचा गणवेश. खांद्यावर दप्तर लटकवलेले.)

**नन्या** : पंपू ऽ ए पंपू ऽ

**बाळ्या** : झोपलाय् काय रे हा ? ए ऽ ऽ

(पंपू सावकाश एक डोळा उघडतो मग दुसरा. नन्या आणि बाळ्या जवळ जातात)

**नन्या** : कसं आहे रे तुझं ? (पंपू बोलत नाही.)

**बाळ्या** : काय रे बोलता येत नाही पंपू ?

**नन्या** : बाळ्या, तापानं वाचा गेली की काय ह्याची ?

**बाळ्या** : पंपू, खरं काय रे नन्या म्हणतो ते ?

**पंपू** : (सावकाश तोंड उघडत) तोंडात चॉकलेट आहे ऽ !

**बाळ्या** : चॉकलेट ? आजारात चॉकलेट चालतं ?

**नन्या** : ऐहॅरे चम्या, औषध कडू असेल म्हणून दिलं असेल चॉकलेट. हो की नाही रे पंपू ? (पंपू 'हो' म्हणतो).

**बाळ्या** : देसाईसरांनी सांगितलं तुला पाहून या म्हणून.

**नन्या** : अरे बाळांनो, तुमचा वर्गबंधू आजारी आहे. त्याला भेटायला जाणं हे तुमचं कर्तव्य आहे, असं नाही तुम्हाला वाटत ?

**पंपू** : हा कोण वर्गबंधू ?

**नन्या** : अरे म्हणजे तू !

**पंपू** : म्हणजे देसाईसरांनी तुम्हाला पाठवलं ?

**नन्या** : हो ते येणार होते, पण त्यांना सर्कसला जायचं आहे.

**बाळ्या** : ते म्हणे इकडे आलेली कुठलीच सर्कस चुकवत नाहीत. अरे, वर्गात आम्हाला करून दाखवलन् त्यांनी.

**पंपू** : काय ?

**बाळ्या** : काय रे नन्या ते ?

**नन्या** : पहिल्यांदा तारेवरची मुलगी कशी चालते ते दाखवलं. अरे, नंदू टिकेकरची छत्री उघडून चालत होते फळ्यासमोर.

**बाळ्या** : तेवढ्यात हेडमास्तर आले. ते पण बघायला लागले देसाईसर रंगात आले होते. मग त्यांनी आम्हाला अस्वलाबरोबरचा नाच करून दाखवला !

**नन्या** : अस्वल म्हणून हणमंत बागवेला उभा केला.

**बाळ्या** : तेवढ्यात हेडमास्तर आत आले. मग काय धमाल रे !

**पंपू** : मला बघायची होती ही सर्कस. पण बाबा सोडणार नाहीत. सारखं बिछान्यावर पडून विश्रांती घे, विश्रांती घे असंच सांगतात.

**बाळ्या** : काय नाय रे एवढी सर्कस बंडल आहे. बहुतेक सगळं आपण बघितलं आहे त्या आधीच्या सर्कशीत. तेच तेच पुन्हा दाखवतात. त्यापेक्षा आपल्या शाळेसमोरच्या मैदानात तो इस्माइल जादूवाला काय टॉप करतो.

**नन्या** : हो ऽ अरे पंपू ऽ (पंपू ऐकण्यात तल्लीन) एका टोपलीत लहान मुलीला ठेवलन् आणि असली मोठ्ठी तलवार मारली रे खच्चाक्कन् आणि मग थोड्या वेळाने गेलेली मुलगी जिवंत !





**बाळ्या** : धमाल करतो. त्या सर्कसपेक्षा डबल टॉप.

**पंपू** : मला मिळेल कारे बघायला ?

**नन्या** : तो काय घरी येणार तुझ्या ?

**पंपू** : हूं ऽ (गप्प रहातो – डोळे मिटून)

**नन्या** : (बाळ्याला कोपराने ढोसून) बाळ्या, मजा आहे रे पंपूची.

**बाळ्या** : कसली मजा ?

**नन्या** : बघ ना काय टॉप टॉप वस्तू आहेत टेबलावर ! ही चॉकलेटं, ही फळं . . .

**पंपू** : हूँ ! वैताग आला खाऊन.

**नन्या** : म्हणे वैताग आला खाऊन. पंपू नशीब समज तुला आजारी पडायला मिळतं. मी कध्धी आजारीच पडत नाही. कध्धी म्हणजे कधी नाही..

**बाळ्या** : येडाच आहेस आजारी नाही पडत तर बरंच की.

**नन्या** : मला नाही असं वाटत. काय रोज रोज पहाटे उठून व्यायाम करायचा, पूजा करायची, जेवायचं, शाळेला जायचं, घरी येऊन पुन्हा अभ्यास, खेळ मग परवचा जेवण आणि झोप. रविवारी पण





बाबा झोपू देत नाहीत. ह्याची मजा बघ. कसा आरामात झोपलाय, आमच्याकडे एकुलता एक पलंग. त्याच्यावर नेहमी आजी झोपलेली असते.

**पंपू** : तुला सांगितलं ना नन्या, एवढी काही मजा नाही त्यात !

**नन्या** : बघ, बघ, बाळ्या . . . स्वतः सगळी मजा करतोय. आणि वर म्हणे– एवढी काही मजा नाही . . . (औषधाची बाटली घेत) कसं लागतं रे हे ?

**पंपू** : शी: ! आंबट कडू . . . .

**नन्या** : मग काय झालं ? मस्त असेल चव, मी कधी घेतलंच नाही. बरं का बाळ्या, खूप वेळा प्रयत्न केला आजारी पडण्याचा, मोठी माणसं– ' असं असं करू नकोस. आजारी पडशील – ' म्हणतात ना, ते सगळं तसं तसं करून पाहिलं, पण छया: ! रात्री झोपताना देवाची प्रार्थना सुद्धा केली. देवा मला फार नाही फक्त दोनचार दिवस तरी आजारी पडवा, जरा मजा करू दे ना . . . पण असलं काय . . . बाबा साडेपाचला खेचून काढतात अंथरुणातून. . . मलाच गुंडाळून ठेवायला लागतं सगळं.

**बाळ्या** : नन्या, देसाईसर तर वर्गात सगळ्यांना सांगतात. ‘मुलांनो, बघा, प्रकृती त्या नन्या गोडबोलेसारखी हवी. नर्मदेतल्या दगडासारखी टणटणीत. त्याला काहीच होत नाही.’

**नन्या** : त्यांना काय सांगायला. (पुन्हा पंपू भोवतालच्या सगळ्या वस्तू अनिमिष नजरेने पहातो) बाळ्या, बघ बघ . . . काय थाट बघू हे रंगीत औषध बघ . . . चॉकलेटं बघ . . . ही मऊ मऊ गादी, सुंदर उशी, रंगीत नरम पांघरुण . . . गोष्टींची पुस्तकं बघ बाळ्या. रंगीत चित्रांची. कुत्रा बघितलास काय मस्त आहे . . . आपण तर बुवा खूष झालो असतो आजारी पडयला. आणि हा वेडपट मुलगा, तरी पिरपिर करतोय वैताग आला म्हणून . . .

**पंपू** : नन्या, गाढवा, कधी आजारी पडत नाहीस म्हणून तुला वाटतं. माझ्यासारखा पुन्हा पुन्हा आजारी पडला असतास तर समजलं असतं.

**बाळ्या** : (एकदम उठून जवळ येतो) पंपू, तुला हे सगळं टाकून बाहेर जावसं वाटतं ?

**पंपू** : तर रे . . . खूप खूप वाटतं. तुमच्याबरोबर गोटचा खेळायला यावं. क्रिकेट खेळायला यावं आणि मुख्य म्हणजे त्या इस्माइल जादूवाल्याचा खेळ बघण्याची खूप खूप इच्छा आहे . . .

**बाळ्या** : आत्ता घरी कोणी नाही ना ?

**पंपू** : नाही. आई आजीकडे आहे. मला नवीन बहीण झालीय ना, तिला घेऊन येणार ती पुढल्या आठवड्यात. आणि बाबा डॉक्टरांकडे गेले आहेत – माझ्या प्रकृतीबद्दल सांगायला.

**नन्या** : डॉक्टर ढमे ना ? (बाळ्याला) म्हणजे ते व्यायामपटू . . .

**पंपू** : बाबांनी शेजारच्या लाडीमामांना माझ्यावर लक्ष ठेवायला सांगितल आहे. ते मधून मधून येऊन बघून जातात.

**बाळ्या** : पंपू, टाळी दे.

**पंपू** : बं ? (टाळी देतो)

बाळ्या : मला एक मस्त आयडिया सुचली आहे.

पंपू : कसली ?

बाळ्या : हे बघ . . . पंपू, तू चल माझ्याबरोबर इस्माइल जादूवाल्याचा खेळ पहायला. (पंपू डोळे विस्फारतो) आणि तुझ्या जागी हा नन्या झोपेल. (नन्याचा चेहरा उजळतो).

पंपू : एहेरे ! शहाणाच आहेस . . . आणि शेजारचे लाडीमामा आले म्हणजे ?

बाळ्या : त्यात काय आहे ? नन्या तोंडावर पांघरूण घेऊन झोपेल. त्यांना कसं कळेल कोण आहे ते ?

पंपू : तेहि खरंच . . . पण बाबा यायच्या आत परत येऊ ना आपण ?

बाळ्या : नक्की ! तुलाही बाहेर पडायला मिळेल आणि ह्यालाही आजारी पडायला मिळेल थोडा वेळ काय ?

नन्या : पंपू . . . बाळ्याची आयडिया टॉप आहे . . .

पंपू : हूं (थोडा वेळ विचार करतो. मग उठतो. कपाळावरची पट्टी काढतो. कपडे सटकतो. उत्साहाने आळस देतो.) नन्या, सांभाळून हं.

नन्या : तू मुळीच काळजी करू नकोस. (नन्या पलंगावर झोपतो. कपाळावर पट्टी ठेवतो. बाळ्या आणि पंपू जायला निघाले आहेत.) पंपू ऽ पंपू. (पंपू थांबतो.)

पंपू : शू ऽ ऽ केवढ्याने ओरडतोस ! काय ?

नन्या : (हळू आवाजात) तू येईपर्यंत हे सगळं . . . हे सगळं माझंच ना ?

पंपू : हो ऽ ऽ य ! (पंपू-बाळ्या जातात.)

(नन्या हळूच पलंगावर बसतो. मग झोपतो. ह्या कुशीवरून त्या कुशीवर असे दोनचारदा करतो. त्याला खूप गंमत वाटते आहे. उठून बसतो. औषधाची बाटली तोंडाला लावून थोडे पितो. तोंड कडू होते. पण खूप बरे वाटते मग चॉकलेट खातो. पुन्हा कुठले तरी गाणे म्हणत पांघरुण घेऊन पडतो पण जास्त वेळ झोपवत नाही कुष्याकडे लक्ष जाते. त्याला घेऊन बसतो.)

नन्या : काय रे, तुझे नाव काय – ? मी तुला जॅक म्हणेन. बस असा. हा अस्सा. तुला कोण व्हायचंय वाटतंरे ... मेंढयांवर पहारा ठेवणारा धनगराचा कुत्रा ऽ, की लांडगे–कोल्हे ह्यांच्या पाठीमागे धावणारा शिकारी कुत्रा, की ऽ ऽ सर्कशीतला कुत्रा ...दोन पायांवर चालणारा हां रे हां. एक धमाल आयडिया सुचलीय्. हे हे बघ मी गुप्तपोलीस आणि तू पोलिसांचा कुत्रा . म्हणजे वासावरून चोर, दरोडेखोर हुडकून काढणारा. हां ऽ ऽ ... ट्रिंग ट्रिंग ट्रिंग हॅलो हॅलो ... मी इन्स्पेक्टर नन्या ऽ ऽ आपलं, नंदकिशोर गोडबोले बोलतोय. काय म्हणता ? खून झालाय् ? कुठे ? हां आलो आलो (काल्पनिक फोन खाली ठेवतांना एक चॉकलेट उचलतो) चल जॅक ... हे घे तुला. (फळाची फोड कुत्र्याला देतो) नको ? बरं ...(स्वत: जातो. चल.. (अंथरुणातच कुत्र्याला चालवतो) हं. अरे एका मुलीचा झालाय् खून ... कमॉन जॅक. नुसत्या वासावरून काढ पाहू शोधून. चल भू: भू: – हं पाहिलंत, त्याला वास लागलाय् चल चल माझं पिस्तूल तयार आहे ही बघ गुहा ... तू चल आत. शू: ऽ ऽ दुष्ट खुनी आत बसलाय् त्याच्याकडे चाकू आहे तो फेकून मारेल ... आ आई ग खांद्याला लागला चाकू (पडतो) ब्रँडी... (पडल्यापडल्या औषधाच्या बाटलीतले औषध पितो) हरामखोर ... थांब – (पिस्तूल काढून झाडल्याचा अभिनय) हा: हा: खलास ... चल जॅक ... शाबास जरा पडतो. मला चाकू लागल्यामुळे जखम झालीय. अशक्तपणा आलाय्.., (पडतो) मी आजारी आहे. ..मी आजारी आहे (खुशीत) आजारी आहे खूप खूप आजारी आहे (पांघरुण छातीपर्यंत घेतो.) अहा ऽ कसं छान वाटतंय ... (उठून) जॅक ऽ ऽ

(बाहेर चाहूल...' काय रे, कसं आहे पंपू ऽ ऽ नन्याची धावपळ ..पांघरुण घेऊन पडतो. मग एकदम उठतो. दपतर खुर्चीवर पडलेले आहे याची आठवण होते. पटकन् जाऊन दपतर आणतो आणि ते पोटावर ठेवून पांघरुण घेतो. पोट फुगलेले दिसते. ते लक्षात आल्यावर उठून दप्तर पलंगाखाली टाकतो आणि

डोक्यावरून पांघरुण घेऊन पुन्हा झोपतो. लाडीमामा आत येतात. धोतर, वर सदरे. पोट सुटलेले, चष्मा व मिशा.)

लाडीमामा : काय रे पंपू ऽ ऽ मी लाडीमामा आलोय. ए पंपू ऽ ऽ झोपलाय वाटतं (हळू आवाजात) ए ऽ ऽ पंपू ऽ ऽ झोपलाय् वाटतं (लक्ष चॉकलेटकडे जाते) झोप. झोप, मी जातो.

(हळूच एक चॉकलेट तोंडात टाकतात, कोणी येत नाही असे बघून आणखी एक उचलतात. नन्या पांघरुण खाली करून हळूच पहातो. लाडीमामा चॉकलेट खातांना दिसतात. नन्या पांघरुणाचे टोक नाकात घालून जोरात शिंकतो आणि पुन्हा डोक्यावर घेऊन झोपतो. शिंकण्याने लाडीमामा एवढे दचकतात की हातातली बशी खाली पडते. लाडीमामा चॉकलेट वेचून बशीत ठेवतात आणि बशी टेबलावर ठेवतात. मग जाताजाता एक चॉकलेट उचलतात)

औषध घेतलंय ना बरोबर. बरं वाटेल...कडू असेल तर वर चॉकलेट खा...मी चांदी काढून ठेवतो हो चॉकलेटांची, म्हणजे तुला खायला सोपं पडेल.

(पुन्हा त्यांना मोह होतो. चॉकलेट तोंडाकडे नेत असताना पुन्हा नन्या बघतो आणि पांघरुणाचे टोक नाकात घालून जोरात शिंकतो. लाडीमामांच्या तोंडाकडे गेलेले चॉकलेट उडून खाली पडते. लाडीमामा रागाने डोक्यावरून पांघरुण घेतलेल्या नन्याकडे पहातात —)

काय रे, सर्दी झाली आहे वाटतं बरीचशी ? शिंकतोय् तो दणादण... (जवळ जाऊन रंगीत पुस्तके पहातात.) वा ! सिल्व्हर कॉमिक, हे काय रेड रायडिंग हूड ! छान छान, आणि हे टॉप थम्ब ... अरे या फँटमसुद्धा आहे ! सुन्दर चित्रे आहेत ... आणून देतो आता ... जरा वेळ घालवायला अरे ... (जातात, नन्या पांघरुण खाली करून बघतो. उठून बसतो.)

नन्या : थँक, ए थँक ! आता मला अगदी बरं आजारी असल्यासारखं वाटतंय.

(आजूबाजूला पहातो. पंपूचा स्वेटर दिसतो. तो घालतो. उशीखाली मफलर मिळतो तो गुंडाळतो. कपाळावर रुमालाची घडी ठेवतो आणि झोपतो.)





(बाहेर आवाज – 'या या डॉक्टर ढे, इथून या...' तुम्ही चला. मी आलोच...पंपूचे वडील येतात. पँट, बुशकोट, बारीक मिशा.)

**पोवळे :** या या डॉक्टर ढे. हा पहा इथे झोपलाय पंपू...(मागे पहात) डॉक्टर ढमे...डॉक्टर ढमे ? ऽऽ.

(डॉक्टर ढमे खिडकीतून उडी मारून आत येतात आणि उजव्या विंगकडे पहात असलेल्या पोवळेच्या मागे येऊन उभे राहतात.)

**डॉ. ढमे :** (पोवळेंच्या कानात) पोवळे मी आऽलो...(पोवळे दचकतात.)

**पोवळे :** तुम्ही ? आलात कुठून ?

**डॉ. ढमे :** ह्या खिडकीतून. उडी मारावी लागली. त्यामुळे व्यायाम झाला... स्नायू हाडे लवचिक होण्यास तेवढीच मदत...शिवाय शरीरात चापल्य येते...मोकळे वाटते...तुम्ही उडी मारून पहा.

**पोवळे :** अहो नको...

**डॉ. ढमे :** पहा म्हणजे पहा...व्यायामाचाच प्रकार हा...आळस उपयोगी नाही. या.

**पोवळे :** अहो पण आता माझ्या मुलाची प्रकृती पहायला आलायत की खिडकीतून उड्या मारायला ?





**डॉ. ढमे** : पोवळे ऽ असं उपयोगी नाही. . .हयगय नाही असा किती वेळ लागतोय. एकदा उडी मारलीत की तुम्हालाच आवडू लागेल व्यायाम या.

**पोवळे** : छे छे, डॉक्टर ढमे, तुम्ही म्हणजे फारच बुवा. . .(कुरकुरत खिडकीकडे जातात. डॉक्टर त्यांना वर चढायला मदत करतात.)

**डॉ. ढमे** : हां बसा तिथे (पोवळे खिडकीच्या कट्ट्यावर पावलांवर बसतात) मारा उडी. . .घाबरू नका, सावकाश. . . (पोवळे उडी मारतात. धडपडतात.) शाबास कसं वाटलं ?

**पोवळे** : डावा पाय जरा दुमडला.

**डॉ.** : थांबा. एक बैठक मारा (ते आणि पोवळे एक एक बैठक मारतात.)

**पोवळे** : आता हे पहा डॉक्टर, तुम्ही पंपूला पहा. . .मग आपण दोघे मिळून व्यायाम करू.

**डॉ.** : (उत्साहाने) दोघे नाही. . .तिघे ! तुमच्या पंपूलाही व्यायाम करायला सांगणार आहे मी नियमित व्यायाम घ्यायला लागला की आजारबिजार कुछ नाही. (नन्या जवळ जातात.) हं. पंपूला काय होतंय् म्हणालात ?

**पोवळे** : हल्ली सारखा आजारी पडतो. सर्दी, खोकला, ताप. . चालूच काल ताप होता आज जरा कमी आहे. . . मी काळजी घेतोच सगळी. तुम्ही पाठवलेलं औषधहि वेळच्या वेळी घेतो तो. (बाटली उचलत) पहा, बाटली संपत आली एकच डोस राहिलाय्.

**डॉ.** : बाळ पंपू ऽऽ असं डोक्यावरून पांघरुण घेऊन पडू नये. शुद्ध हवा शरीरात जाणार कशी ? काय पोवळे ?

**पोवळे** : त्याला तशीच सवय आहे. थंडी वाजत असेल. सकाळी कुडकुडत होता. तरी स्वेटरबिटर दिला आहेच. काही कमी नाही.

**डॉ.** : पावलं चोळा ब्रँडीनं. . . थंडी जाईल अंगातली. . . थांबा. (बॅगेतली एक लहानशी बाटली काढतात. . . हातावर थोडी घेऊन ठेवून, मग हातावर हात चोळतात.) हं पंपू ऽ पावलं बाहेर काढ बघू ? (पोवळे पावलावरचे पांघरुण उचलतात. डॉक्टर ढमे पावलांवर हात घासतात नन्या गुदगुल्या होऊन पांघरुणात उडू लागतो.) हं हं हलू नकोस (नन्या खिदळतोच आहे.)

**पोवळे** : (ओरडून) पंपू ऽऽ (नन्या एकदम थांबतो. डॉ. ढमे उभे रहातात. नॅपकीनला हात पुसतात.)

**डॉ.** : आता ऊब येईल अंगात.

**पोवळे** : सारखासारखा आजारी पडतो हा. मला फार काळजी वाटते ह्याची...

**डॉ.** : मिस्टर पोवळे, मी तुम्हाला सांगतो. . . पंपूला व्यायाम करायला सांगा. (मोठ्याने) नियमित व्यायाम !

**पोवळे** : डॉक्टर ढमे तो ऐकत नाही.

**डॉ.** : ऐकत नाही ? मग सांगून उपयोग नाही.

**पोवळे** : म्हणजे ?

**डॉ.** : स्वत: त्याच्याबरोबर करा. म्हणजे तो आपोआप करेल. . .

**पोवळे** : कोण ? मी ?

**डॉ.** : हो, तुम्ही . . . मी मुलांच्या मानसशास्त्राचा अभ्यास केला आहे. . .

त्यांना...आणि तमुक एक गोष्ट करा म्हटलं की ती टाळण्याची वृत्ती असते त्यांची...म्हणून तुम्ही आदर्श घालून दिला पाहिजे... आता उदाहरणार्थ व्यायाम ! तुम्ही सुरू करा...तुमचं बघून आपो-आपच...

**पोवळे** : अहो पण ह्या वयात व्यायाम म्हणजे...

**डॉ.** : (ओरडून) वय ? (पोवळे दचकतात) वय ? इकडे या...जवळ या (ते येतात) माझं काय वय आहे ?

**डॉ.** : काय हो ?

**पोवळे** : आपलं असेल चाळीसएक...

**डॉ.** : चाळीस ? मिस्टर पोवळे, तुमच्या हातापायाची बोटं किती ?

**पोवळे** : (मोजत) पाच नि पाच दहा आणि अकरा एकवीस...

**डॉ.** : एकवीस ?

**पोवळे** : ह्या पायाला एक जास्त बोट आहे...

**डॉ.** : त्याच्या दुप्पट करा...केलेत ?

**पोवळे** : हो...(पुटपुटत) एकवीस दुणे बेचाळीस.

**डॉ.** : त्यात सहा मिळवा...मिळवलेत ?

**पोवळे** : हो...(पुटपुटत) बेचाळीस नि सहा अठ्ठेचाळीस...

**डॉ.** : त्याला दोनानी भागा...भागलंत ?

**पोवळे** : थांबा...बरीच वर्षं गणितं केली नाहीत...अठ्ठेचाळीस भागिले दोन...म्हणजे हां चोवीस.

**डॉ.** : त्याला तीनने गुणा...गुणलंत ?

**पोवळे** : (घाम पुसत) चोवीस त्रिक...चोवीस त्रिक...किती हो.

**डॉ.** : मला काय विचारता !

**पोवळे** : बहात्तर !

**डॉ.** : त्यातून बारा वजा करा...किती राहिले ?

**पोवळे** : (मोठ्याने) पन्नास !

**डॉ.** : काय ?

**पोवळे** : नाही. साठ साठ...

**डॉ.** : मिस्टर पोवळे ऽ तेच माझं वय...

**पोवळे** : तुमचं वय साठ ? वाटत नाही...फार तर चाळीस वाटतं.

**डॉ.** : वाटायचंच...वाटेल ते करायला सांगा मला...लहान मुलासारख्या उड्या मारायला सांगा...धावायला सांगा...खेळायला सांगा आपली तयारी आहे. बघा हं (जागच्या जागी टाळ्या वाजवत उड्या मारतात.) ह्या..ह्या..ह्या ह्या (टेबलावर चढून एक, दोन आणि साडेमाडे तीऽऽन ! (तिथून उडी मारतात.) आता कोलांटी उडी...

**पोवळे** : बाप रे : अहो नको नको.

**डॉ.** : बघा हं (कोलांटी मारतात. उभे राहूनकपडे झाडतात) कसं वाटलं ?

**पोवळे** : चांगलं आहे...

**डॉ.** : तर मी काय सांगत होतो ?

**पोवळे** : पंपूला तपासायचं आहे...

**डॉ.** : हां...हां...ते मग ! मी सांगत होतो तुम्हीच व्यायामाचा आदर्श घालून दिला पाहिजे...सकाळी उठल्यावर त्याच्याबरोबर साधा व्यायाम करायचा...प्रथम नुसत्या उड्या...हं तुम्ही करा मी शिकवतो...सोपं आहे...

**पोवळे** : अहो नको...तुम्ही तपासा त्याला..

**डॉ.** : करा हो...उभे रहा ताठ (पोवळे नाइलाजाने उभे रहातात) हं हात चिकटवा शरीराला. हं, आता सुरू. एक म्हटल्यावर उडी मारून पाय लांब...आणि हात पसरून असे जमिनीला समांतर...पुन्हा दोन म्हटल्यावर उडी मारून पहिल्यासारखे उभे...हं स्टार्ट ! एक–दोन

हं..एक..दोन... एक दो... छान बरोबर एक दो (दोघे ड्रिल करत असताना लाडीमामा येतात. आश्चर्याने बघू लागतात.) एक दोन एक दो (लाडीमामांकडे लक्ष जाते) एक दोन एक दोन...

(तिघेहि उड्या मारीत असताना नन्या हळूच पांघरुण खाली करून पहातो. आश्चर्याने डोळे विस्फारतो. त्याला पटकन् हसू फुटते. डोक्यावरून पुन्हा पांघरुण घेतो.)

**लाडीमामा** : अहो हे काय वेड्यासारखं ?

**पोवळे** : थांबा थांबा (तिघेहि थांबतात) डॉक्टर, हे लाडीमामा – आमचे शेजारी. आणि लाडीमामा, हे डॉक्टर ढमे – पंपूला तपासायला आणलंय् आज. हुशार आहेत खूप...

**डॉ.** : हं...हं. .त्यात काय येवढं...

**लाडीमामा** : सारख्या शिंका येतात...

**डॉ.** : (पटकन् लाडीमामाच्या जवळ जाऊन) आ ऽ करा.

**लाडीमामा** : आ ऽ ऽ.

**डॉ.** : जीभ बाहेर काढा..हं. आता नाक बघू...हं ऽ तपकीर ठासून भरली आहे..मग शिंका येणारच.

**लाडीमामा** : अहो मला नव्हे..पंपूला. माझं नाक काय बघता ?

**डॉ.** : अच्छा (पंपूकडे येतात).

**पोवळे** : नीट जेवत नाही...चेहरा निस्तेज दिसतो...

**डॉ.** : अशक्तपणा... थांबा मी इंजेक्शन देतो शक्ती येण्यासाठी. (बॅग-मधून इंजेक्शन काढतात, वायल काढून सिरिंज भरतात) हं बाजूला व्हा...

**पोवळे** : बापरे ! कसलं हें इंजेक्शन ?

**डॉ.** : शक्तीचं.

**लाडीमामा** : आपल्याला बुवा बघवायचं नाही (कॉटकडे पाठ करून उभे रहातात.)

**पोवळे** : कुठे देणार इंजेक्शन ?

**डॉ.** : (नन्याजवळ सरकत) आणखी कुठे ? हा: हा: हा: नेहमीच्या जागी. (नन्या चुळबुळ करू लागतो.) हं, पंपू ?

**पोवळे** : बाळ पंपू ऽ

**लाडीमामा** : पंपू बाळा ऽ

**डॉ.** : पांघरुण बाजूला कर बघू. . . (नन्या तसाच चुळबुळ करतो आहे.)

**पोवळे** : अगदी दुखणार नाही बघ.

**डॉ** : अहो तुम्ही या मदतीला. . .तसं ऐकायचीच नाहीत ही मुलं (दोघे जवळ जातात. डॉ. ढमे इंजेक्शन खाली आणतात. नन्या चुळबुळ फारच वाढली आहे) धरा. . .धरा घट्ट. . .आता देतो हं.

(नन्या 'मेलो' 'मेलो' ओरडत ताडकन् उठतो आणि डॉक्टरांच्या पायामधून बाहेर पडून पळू लागतो......लाडीमामा लांब उभे असतात ते त्याला पकडू लागतात.)

अरेच्या, हा कोण दांडगट मुलगा ?

**पोवळे** : आँ ! हा तर नन्या ! गोडबोले. . .अरे हरामखोरा ?

**लाडीमामा** : पकडा त्याला.......(थोडी पळापळी होते. . .नन्या तिघांना चकवू पहातो पण शेवटी पोवळे पकडतात.)



नन्या : अं . . . अं . . . मी मला मी . . .

पोवळे : काय रे कार्ट्या ऽ ऽ तू इथे काय करतोय्स्...

डॉ. : आम्हाला फसवलं काय ?

लाडीमामा : बोल बोल (त्याचा कान पिरगळतात )

नन्या : ओय् ओय् अहो सोडा मला . . .सोडा . . .मी सांगतो...

पोवळे : काय सांगतोस ? पंपू कुठे आहे ?

नन्या : पंपू इस्माईल . . .

पोवळे : पंपू इस्माईल नव्हे. पंपू पोवळे . . .पंपू सदाशिव पोवळे (कान पिरगळत) कुठे आहे तो ?

नन्या : आय . . .तेच सांगतोय् . . .इस्माईल जादूवाल्याचे खेळ पहायला गेलाय्.

पोवळे : इस्माईल जादूवाल्याचे खेळ ? हा आजारी असताना ?

नन्या : तो म्हणतो की त्याला बरं वाटतं . . .

पोवळे : बरं वाटतं ? मग मी काय मूर्ख आहे म्हणून त्याला झोपून रहायला सांगतो ?

लाडीमामा : घेऊन ये त्याला.

नन्या : तो येईलच इतक्यात.

लाडीमामा : काय रे, म्हणजे मघापासून तूच झोपलेला होतास तर इथं.

नन्या : हो

लाडीमामा : आणि शिकत होतास जोरजोराने . . .

नन्या : हो . . .

लाडीमामा : काय काय पाहिलंस रे पांघरुणाखालून ?

नन्या : काही नाही . . .

लाडीमामा : नाही कसं ? मी . . मी काय केलं सांग पाहू ? कसा आलो तो ?

नन्या : अं . . . अं . . . म्हणजे तुम्ही आलात तसे . . . तिथून येऊन ह्या इथं उभे राहिलात . . .

लाडीमामा : मग ?

नन्या : मग तुम्ही 'ए पंपू ऽ झोपलायस् वाटतं' असं म्हटलंत.

लाडीमामा : हं हं . . .

नन्या : मग जायला निघालात. तेवढ्यात ती चॉकलेटची . . .

लाडीमामा : पुरे . . . पुरे ढोंगी कुठचा . . . झोपेचं सोंग घेऊन पडला होता . . .

डॉ. : काय रे, पण तू का म्हणून झोपलास इथं ?

पोवळे : पंपूने सांगतलं वाटतं तुला ?

नन्या : नाही. बाळ्यानं आयडिया सांगितली आम्हाला मला ना खूप आवडतं आजारी पडायला . . .

डॉ. : आजारी पडायला ?

पोवळे : महामूर्ख आहे हा . . .

नन्या : मला वाटायचं, आजारी पडणाऱ्याची काय धमाल असते. बघा ना . . . रंगीत पुस्तकं, खाऊ खेळणी . . . पुन्हा सगळे कौतुक करतात. मस्तपैकी पडून रहायचं मऊ मऊ गादीवर असं पांघरुण घेऊन कसा छान वेळ जातो.

पोवळे : अस्सं !

नन्या : असं वाटायचं मला. पण खरं म्हणजे मला आत्ताच कंटाळा आलाय् येवढी काही मजा नाही त्यात . . . शिवाय (डॉ. ढमेंकडे पहात) चॉकलेटं पण सगळी मिळत नाहीत खायला, कंटाळा आला.

पोवळे : थांब, तुझा कंटाळा घालवतो सगळा (कान पकडीत) तुझ्या वडिलां-कडे घेऊन जातो. चल . . .

लाडीमामा : अगदी सोडू नका त्याला उर्मट कुठचा . . . (त्याला धरून

नेऊ लागतात. तेवढयात पंपू आणि बाळयाचा आवाज ऐकू येतात म्हणून थांबतात. पंपू आणि बाळ्या तारस्वरात हिंदी सिनेमातले गाणे म्हणत येतात. ये ये जवानी ऽ ऽ हे दिवानी ऽ आः मेरी रानी ' आणि आत आल्यावर गाण्याची ओळ अर्धवट थांबवतात.)

**पंपू** : (हसण्याचा प्रयत्न करीत) अं – कधी आलात बाबा ?

**पोवळे** : (काही क्षण सर्व जण पंपूकडे एकटक पहात आहेत.)

**पोवळे** : (संथ सुरात) डॉक्टर ढे . . .

**डॉ.** : (पंपूवरची दृष्टी न काढता) एस् मिस्टर पोवळे . . .

(अचानक डॉ. ढमे झटक्यासरशी आपली बॅग उघडतात, थर्मामीटर काढतात आणि पंपूच्या तोंडात खुपसतात.)

**पोवळे** : कुठे गेला होतास गाढवा ?

**पंपू** : (थर्मामीटरमुळे बोलता येत नाही.) उम् . . . हूं...उम् . . .

**पोवळे** : तोंड उघडू नको . . .

**पंपू** : हूं . . .

**पोवळे** : गेला होतास कुठं बिछाना सोडून ?

**पंपू** : उम् (हातांनी दाखवायाचा प्रयत्न करतो.)

**बाळ्या** : अं ऽ . . . अं : . . . आम्ही ना ऽ

**पोवळे** : तू गप . . .

**लाडीमामा** : एकदम गप . . .

**बाळ्या** : हो . . . (डॉ. ढमे स्टेथॅस्कोप कानाला लावतात.)

**डॉ. ढमे** : (ओरडून) छाती !

(पंपू एकदम छाती पुढे करून जोराने श्वासोच्छ्वास करू लागतो. डॉ. ढमे थर्मामीटर काढतात. पुसून पाहू लागतात. लाडीमामाहि जवळ येऊन पाहू लागतात. ढमे त्यांच्याकडे रागाने बघतात. लाडीमामा बाजूला होतात.)

**पोवळे** : पाहिलंत ?

**डॉ.** : नॉर्मल (पुन्हा पंपूकडे जात) तोंड उघड . . . आ कर. . .आ ऽ

**पंपू** : आ ऽ ऽ

**लाडीमामा** : नॉर्मल.

**डॉ.** : (त्यांच्याकडे पाहून) नॉर्मल.

**पोवळे** : म्हणजे ह्याला काही झालं नाही असंच ना ? ठीक आहे . . . मीच मूर्ख जा रे तू जादू बघायला . . . हे सगळं कशाला हवंय् मग ? ही औषधं ही खेळणी. . .ही पुस्तकं . . . ही चॉकलेटं . . . फेकून देतो सगळं . . .

**लाडीमामा** : चॉकलेट फेकणारच असाल तर मला द्या.

**पोवळे** : काय ?

**लाडीमामा** : नाही . . . फेकण्यापेक्षा मला द्या . . . लहान मुलांना वाटायला . .

**बाळ्या आणि नन्या** : आम्ही येतो . . . (नन्या अंगातून पंपूचा स्वेटर काढतो, पलंगाखालचे दफ्तर घेतो.)

**पोवळे** : जा आपल्या घरी . . . अभ्यास करा (ते जातात.)

**लाडीमामा** : बरं पोवळे . . . काही लागलं तर कळवा . . (जातात)

**डॉ. ढमे** : मीही येतो मिस्टर पोवळे . . . दुसऱ्या एका पेशंटकडे जायचं आहे.

**पोवळे** : थांबा – (खिडकीचा पडदा बाजूला करून उभे रहातात.)

**डॉ. ढमे** : छे . . . छे. आता खिडकीतून नाही. येताना खिडकीतून जाताना दरवाज्यातून . . . ते व्यायामाचं लक्षात ठेवा मात्र . . . मघाशी मी दाखवला तुम्हाला तो . . .

**पोवळे** : हो . . . (डॉ. ढमे जातात.) पंपू ऽ

**पंपू** : काय बाबा ?

**पोवळे** : तुला खरंच बरं वाटतंय ना आता ? चला . . .

**पंपू** : बाबा, त्या इस्माइल जादूवाल्याने काय टॉप जादू केल्या ! चादरीखाली त्यानं मुलीला झोपवलं . , . चादर आपोआप हवेत उचलली गेली . . . आणि मग चादर झटकून हातात घेतली तर आत कोणीच नाही . . . कसं हो करतो तो ?

पोवळे : मला नाही माहीत . . .

पंपू : मला शिकवली त्याने तर धमाल येईल.

पोवळे : ते असू दे . . . तुझी सहामाही परीक्षा कधी ?

पंपू : वेळ आहे . . . पुढल्या महिन्यात.

पोवळे : घेऊन ये बघू पुस्तकं आणि वह्या . . . बघू तुला काय येतंय् ते आणि प्रगतिपुस्तकहि आण . . .

(पंपू चेहरा टाकून जातो. दप्तर आणतो )

पोवळे : हं . . गणित काढ पाहू . . .

पंपू : बाबा ऽ ऽ

पोवळे : वही बघू . . .

पंपू : बाबा ऽ ऽ ऽ

पोवळे : कुठपर्यंत झालंय् ?

पंपू : बाबा, माझा घसा दुखतोय.

पोवळे : काय ?

पंपू : होय . . . गिळताना त्रास होतो . . . डोकं पण जड होतं . . .

पोवळे : डोकं ?

पंपू : हो मघाशी मी सांगणार होतो डॉक्टर ढम्यांना . . . पण म्हटलं ते तपासतायत् तर कशाला बोला. डोळ्यांची आग होते मधूनमधून.

पोवळे : अरे, अरे . . . मग सांगायचं नाही का मला ?

पंपू : तुम्ही अभ्यास घेतो म्हणालात . . . मग मी कसा सांगणार ?

पोवळे : अरे अभ्यास महत्वाचा की प्रकृती महत्वाची ? आधी प्रकृती. तू झोप बघू . . .

पंपू : असू दे . . .

पोवळे : झोप . . . ते दप्तर ठेव बाजूला , . . झोप लगेच (खिडकीकडे जाऊन डॉक्टर ढमे . . . अहो ढमे . . . गेले वाटतं. थांब मी आलो . . . तू विश्रांती घे. (घाईघाईने उजवीकडून जातात. पंपू पडल्या-पडल्या ते गेल्याचे पहातो. मग डोक्यावर पांघरुण घेतो.) ✱ ✱



# कहाणी कोरड्या गाभाऱ्याची

## रत्नाकर मतकरी

मोकळा रंगमंच. राजा आणि प्रधान येतात.

**राजा** : प्रधानजी !

**प्रधान** : आज्ञा महाराज.

**राजा** : राज्याचा बंदोबस्त ठीक आहे ना ?

**प्रधान** : होय महाराज. राज्याचा बंदोबस्त ठीक आहे; पण –

**राजा** : पण काय ? संप होतात ?

**प्रधान** : होतात आणि मिटतात; पण –

**राजा** : पण काय ? लोक गरीब आहेत ?

**प्रधान** : नाही महाराज. सगळ्यांनी आपआपली गरिबी हटवलेली आहे. सगळ्यांचे खिसे तुडुंब भरून वाहताहेत. पण –

**राजा** : पण काय ? राज्यांत नवीन एखादी रोगराई ?

**प्रधान** : नाही महाराज; सगळे रोग, सगळ्या साथी आपल्या राज्यात येऊन जुन्याच झाल्या आहेत. नवीन काही नाही. पण –

**राजा** : मग आणखी पण कसला ? मघापासून पाहातोय – एकसारखा 'पण' – लावायला तुम्ही काय स्वयंवर मांडलंय् ?

**प्रधान** : स्वयंवरातल्या पणापेक्षा अवघड पण आहे हा, महाराज. राज्यात सगळीकडे आबादीआबाद आहे; पण – पण ती लौकरच खलास होणार आहे महाराज.

राजा : का ? प्रधानजी – लौकर काय ते बोला. सीमेवरून शत्रूचा हल्ला तर येणार नाही ?

प्रधान : नाही महाराज. शत्रुप्रदेशात अंतर्गत यादवी चालू आहे; त्यामुळे शत्रूला आपल्यावर हल्ले करण्याइतकी फुरसतच नाही.

राजा : मग ? मग झालंय् तरी काय ? लौकर सांगा प्रधानजी – आम्ही घाबरून गेलो आहोत.

प्रधान : महाराज – राज्यात दुष्काळ पडू पहातोय् –

राजा : काय म्हणालात ? दुष्काळ ?

प्रधान : होय महाराज – वेधशाळांनी असं कधीपासून सांगून ठेवलंय् की यंदा पावसाचं मुळीच चिन्ह नाही.

राजा : वेधशाळेनं असं सांगितलंय् ? मग पाऊस नक्कीच पडणार प्रधानजी. वेधशाळेचा अंदाज खोटा ठरल्याशिवाय कधीच राहाणार नाही.

प्रधान : पण हा अंदाज खरा ठरेलसं दिसतंय्, महाराज. तसं सगळ्या ज्योतिषांनी सांगितलंय्. ज्योतिष्यांचं बरोबर आहे असं वैद्यांनी सांगितलंय्. वैद्यांचं बरोबर आहे असं प्राचार्यांनी सांगितलंय्. प्राचार्यांचं बरोबर आहे असं पत्रकारांनी सांगितलंय्. पत्रकारांचं बरोबर आहे असं त्यांनी स्वतःच सांगितलंय्.

राजा : पुरे, पुरे मला समजलं. यंदा दुष्काळ पडणार आहे –

प्रधान : होय महाराज – प्रचंड दुष्काळ – सगळं पीक जळून जाणारंय. लोक उपासानं तडफडणार आहेत. धान्याचा काळा बाजार होणार आहे. त्यासाठी घरंदारं विकली जाणार आहेत –

राजा : नाही, नाही. प्रधानजी आमच्यानं ऐकवत नाही –

प्रधान : घरंदारं विकल्यानंतर लोक चोऱ्यामाऱ्या करणार आहेत – राजाच्या खजिन्यावर धाड घालणार आहेत – सारं राज्य बेचिराख होणार आहे.

राजा : नाही प्रधानजी . . असं होणार नाही – आम्ही उपाय शोधून काढू –




(राजा रथकुंडीला घेऊन जातो. त्याच्यामागून प्रधान. दुसऱ्या बाजूने दवंडीवाला येतो.)

**दवंडी :** ऐका ऽ ऽ – राजा म्हणे उपाय शोधणार दुष्काळावर – दिवसरात्र विचार करतो या प्रश्नावर – कसा हटवावा दुष्काळ जो पडलाय् राज्यावर – राजाला चिंता जडली अहो राजाची झोप उडाऽली – इकडे दुष्काळ आला चालून झपाझपा गेला जळून दाणा सपासपा खायाला नाही – प्यायला नाही अशी साऱ्यांची झाली दैना – आला दुष्काळाचा तेरावा महिना – (जातो)

(तिकडून येते शंकराचे देऊळ. म्हणजे दोन पायऱ्या एक कमान, पायऱ्यांच्या मागे गाभारा आहे असे समजायला हरकत नाही)

(राजा आणि प्रधान येतात)

**राजा :** (देवळांत जातो – कमानीला लावलेली घंटा वाजवतो.) महादेवा – राज्यावर दुष्काळ पडला – का तुझा असा कोप झाला ?

**प्रधान :** कोप झाला ?

**राजा :** माणूस अन्नाला पारखा झाला – भुकेनं तडफडू लागला –

**प्रधान :** तडफडू लागला !




राजा : माणूस माणसाला ओळखेनासा झाला – खजिना सरला – देश संकटात आला.

प्रधान : देश संकटात आला –

राजा : महादेवा, शंभू महादेवा, देशावरचं हे संकट तुला पाहवतं कसं ! आम्ही सारी तुझीच लेकरं आहोत. सगळे उपाय करून थकलो. आता तूच आमचा त्राता. आमच्यावर कृपा कर. देशावर दया कर. दुष्काळाचं हरण कर. संकटाचं निवारण कर.

(गाभाऱ्यातून महादेव प्रकट होतो.)

महादेव : कशाला ? काही गरज नाही. दुष्काळ वाढू द्या – संकट ओढवू द्या. देश बुडू द्या.

राजा : महादेवा – असं बोलू नका. देश बुडाला तर काय होईल ?

महादेव : काही राहिलं नाही. तेवढी देशाची लायकी नाही. तो बेचिराख होऊन जाऊ दे. तीच त्याची लायकी !

राजा : महादेवा, असं बोलायला कारण तरी काय घडलं ? माझ्या देशात असं काय वाईट आढळलं ?

महादेव : वाईट ? काय चांगलं आहे तुझ्या देशात ! प्रत्येकजण स्वार्थी – स्वत:पुरता विचार करणारा. आपला खिसा भरण्यासाठी दुसऱ्याची मान मुरगाळणारा. असला देश जळू दे पृथ्वीवरचं थोडं पाप कमी होईल. आणि शिवभक्तासाठी भस्म वाढेल. मी दुष्काळ मागे घेणार नाही – देशाला वाचवणार नाही !

राजा : शिवशंभो, असे निष्ठूर होऊ नका ! एकदा संधी द्या. देशाचा संहार करू नका. एकच अखेरची संधी द्या.

महादेव : ठीक आहे. तुझी आजवरची शिवभक्ती ध्यानांत घेऊन मी तुला एक संधी देत आहे.

राजा : सांगा, सांब सदाशिव, आम्ही काय करावं, म्हणजे राज्यावरचा दुष्काळ दूर होईल ?

महादेव : माझा गाभारा दुधानं भरा. प्रत्येकाला सांगा की जेवढं शक्य तेवढं दूध माझ्या गाभाऱ्यात ओता. गाभारा भरला तरच दुष्काळ दूर होईल –

राजा : एवढंच ना ? महादेवा, माझ्या इतक्या मोठ्या प्रजेला तुझा गाभारा दुधानं भरणं कठीण का आहे ? पाहाशील तू – गाभारा भरून उतू जाईल – दुधाच्या नद्या वाहातील –

महादेव : मग दुष्काळ दूर होईल – पण लक्षात ठेव – ही अखेरची संधी आहे – (अंतर्धान पावतो.)

राजा : प्रधानजी धन्य आपण – महादेवाची ही लहानशी अट पुरी केली तर आपलं एवढं मोठं संकट दूर होईल – फुकट – फुकट आपण इतके उपाय आजवर केले.

प्रधान : पण महादेवाची तरी कमाल आहे. दुष्काळ दूर करायचा, तर सरळ दूर करायचा. त्यासाठी गाभारा भरायची अट कशाला घातली ?

राजा : नशीब समजा. देव आहे म्हणून लहानशी अट घातली. माणूस असता तर आपण सरकारी कचेरीत अर्जदारांना देतो, तसा अटींचा

एक लांबच्या लांब खर्डाच भरून घेतला असता चला – राज्यात दवंडी पिटवू. (जातात.)

(दवंडीवाला येतो )

**दवंडी :** ऐका हो ऐका – आपल्या नगरीचे महाराज प्रत्येक नागरिकाला कळवू इच्छितात – की उदईक सकाळी प्रत्येक घरातून दुधाचा हंडा म्हणा, लोटा म्हणा तांब्या म्हणा, पातेली म्हणा – ज्याला जे शक्य असेल तेवढं दूध त्यानं शंकराच्या देवळाच्या गाभाऱ्यात आणून टाकावं हो ऽ ऽ गाभारा दुधानं भरला तर अवर्षण सुटणार आहे हो ऽ ऽ दुष्काळ टळणार आहे हो ऽ ऽ दूध घेऊन जा हो ऽ ऽ ऽ गाभारा भरा हो ऽ ऽ ऽ (जातो.)

(गणा येतो चंद्री येते )

**चंद्री :** आता ग बया – या राजाला काय याड लागलंया का खूळ ? घरात प्वाराचं भागवता भागवता झालंय कठीण आन् म्हनं ऽ ऽ गाभाऱ्यात निऊन दूध वतून टाका –

**गणा :** अग, त्येचा मागं हेतू हाय् राजाचा. दुधानं गाभारा भरला मंजी महादेव प्रसन्न होतुया आन् राज्यावर पडलेला ह्यो दुष्काळ दूर करतुया न्हवं का –



**चंद्री** : त्ये का बी असल – पन म्या माज्या घरातला दुदाचा थेंब बी निऊन गाभाऱ्यात वतायची न्हाई –

**गणा** : अग पन आसं एकट्यादुकट्यानं बोलून कसं भागायचं? समद्या राज्यावर संकट आलं हाये न्हाई?

**चंद्री** : समद्या राज्याचं मस्नी काय बी सांगू नगा. माज्या प्वाराला दूध हुवं–त्ये म्यां गाबाऱ्यात वतायची न्हाई!

**गणा** : हळूहळू – राज्याच्या शिपायानं हे ऐकलं म्हंजी भरली का आपली दोगांची (आणि लांब उभा राहून राजाचा शिपाई हे ऐकतोय)

**चंद्री** : अवं – त्येला काय समजणार हाये इक्ते समदे लोक दूद वतनार हायती – त्येच्यांत आपुन नाय वतलं बुडकुलीभर दूद तर कोनाला पत्या लागणार हाये?

**गणा** : काय – म्हन्त्येस काय?

**चंद्री** : नीट ऐकून घ्या. (बुडकुली त्याच्या हातात देत) ही घ्या दुदाची बुडकुली.

**गणा** : अग पन ही रिकामीच हाये!

**चंद्री** : पण तिचं त्वांड झाकल्यालं हाये न्हवं! आता तुम्हीबी आपलं त्वांड तसंच झाकून ठेवा अन् डोळे मिटून म्हादेवाचं नाव घिऊनशानी बुडकुली गाभाऱ्यात रिकामी करा न् या – कुनाला कळणार न्हाई तुमी दूद वतलं न्हाई असं.

**गणा** : पन माला भ्या वाटतं ग!

**चंद्री** : काय न्हाई भ्या नि फया! चला न्हाईतर – मीच येते तुमच्या संगट!

**शिपाई** : (पुढे होऊन) थांबा – कुठं चाललांत?

**चंद्री** : देवळात चाललो न्हवं का – गाबाऱ्यात दूद वतायला.

**शिपाई** : आस्सं! कुठनं आणलं दूध? सरकारी दूधकेंद्रावरून वाटतं?

**चंद्री** : आरं हट्ट, होतोय की नाय बाजूला? आमची वाट अडवतोय म्येला.



**शिपाई** : काय हो, रिकामी बुडकुली घेऊन चाललाय् आणि वर ही हुशारी ? दाखवता का बुडकुली उघडून ? राजाज्ञा मोडून राजाला फसवणं हा गुन्हा आहे. आहे ठाऊक ?

**चंद्री** : माफ करा बाबा – एक वेळ सोडून दे.

**शिपाई** : छे – नाव नका काढू सोडण्याचं – अपराध्याला शिक्षा करणं हे माझं कर्तव्य आहे. आणि ते मी पार पाडणारच. काय समजलात ?

**गणा** : शिपाईदादा – (त्याला एका बाजूला घेऊन) ही घ्या हातातली कडी. पण आम्हाला मुकाट देवळात जाऊ द्या – कुठं बोलू नका –

**शिपाई** : बरं बरं – आता कसे वठणीवर आलात. आणि ती कडी इकडं, व्हा आता चालते.

(ती दोघे जातात. दुसऱ्या बाजूने शेटजी नोकरांच्या खांद्यावर दुधाचे हंडे घेऊन येतात.)

**शिपाई** : कोण ? शेटजी – अरे बापरे – इतकं दूध ?

**शेठ** : मग नको आणायला ? अरे राजाची आज्ञा म्हणजे काय भलतशी गोष्ट आहे ? शिवाय काम देवाचं आहे –

**नोकर १ :** हो ना आमचे शेठजी फार भाविक आहेत.

**नोकर २ :** हो – दिवसभर काय वाटेल ते करतील – पण रात्री देवाचं नाव घेतल्याशिवाय झोपणार नाहीत !

**शेठ :** बरं बरं – फालतू वटवट नको – चला ते हंडे घेऊन – हां हां शिपाई बुवा – हंडे उघडायची गरज नाही – ही घ्या तुमची बक्षिसी. राहू दे राहू दे –

(शिपायाला बक्षिसी देऊन नोकरासह जातो. दवंडीवाला येतो.)

**दवंडीवाला :** असे सकाळपासून रात्री पर्यंत किती आले - किती गेले – साऱ्यांचे दुधाचे हंडे आपले झाकलेले. अहो, झाकली मूठ सव्वा लाखाची – कृपा शंभू महादेवाची – असं म्हणत गाभाऱ्याशी आले. गाभारा सारा बंद – एक उघडं मात्र छिद्र. तिथं गर्दी उसळे – शिवनाम गजर चाले. असे सकाळपासून रात्रीपर्यंत होतच राहिले – आणि मग काय नवल झाले –

**राजा :** (प्रधानासह येऊन) प्रधानजी, सकाळपासून इतकी गर्दी येऊन गेली– अजून गाभाऱ्याबाहेर दुधाचा एक ओघळ नाही. शिवशंभोची वाणी नाही – आभाळात काळा ढग नाही – ढगात पाणी नाही – काय आहे हा प्रकार ?

**प्रधान :** आपली आज्ञा असेल तर गाभारा उघडून पाहातो महाराज.

**राजा :** आज्ञा आहे. गाभारा उघडा.

(प्रधान पुढे होऊन गाभारा उघडतो धक्का बसल्याप्रमाणे धावत मागे येतो )

**प्रधान :** महाराज – महाराज ! महदाश्चर्य ! महाराज – भयंकर ! केवळ भयंकर !

**राजा :** काय झालं प्रधानजी – काय झालं ?

**प्रधान :** महाराज – गाभारा कोरडा आहे – त्याच्यात दुधाचा एक थेंबही नाही !

**राजा** : काय म्हणालात ? गाभारा कोरडा आहे ? (धावत जाऊन स्वत: पाहून येतो) शिवशंभो – हे कुठल्या जन्मीचं पाप ? गाभारा कोरडा कसा राहिला ? इतकं दूध कुठं गेलं ? (दु:खाने मूर्छित पडतो.)

**प्रधान** : महाराज, शांत व्हा महाराज, उठा

**राजा** : आपण पापी आहोत. प्रधानजी आपल्या नागरिकांनी ओतलेल्या दुधाचा शंभूमहादेव स्वीकार करीत नाही.

**प्रधान** : नाही महाराज. असं झालेलं नाही. मनापासून अर्पण केलेलं कांहीही शंभूमहादेव नाकारीत नाही.

**राजा** : मग – मग काय –

**प्रधान** : महाराज, क्रोध आवरणार असाल तर सांगतो.

**राजा** : सांगा प्रधानजी. लौकर सांगा.

**प्रधान** : महाराज, आपल्या नागरिकांनी गाभाऱ्यात दूध ओतलंच नाही.

**राजा** : काय म्हणालात ?

**प्रधान** : खरं आहे महाराज, प्रत्येकानं स्वत:च्या घरचं दूध वाचवलं. त्याचा परिणाम काय होईल याचा विचार न करता.

**राजा** : पण इतके सगळे लोक सकाळपासून रांगा लावून –

**प्रधान** : होय महाराज. प्रत्येकाला वाटलं की इतकं दूध गाभाऱ्यांत जमा होणार आहेच, तर आपण दूध ओतलं नाही तर काय बिघडणार आहे ? म्हणून कुणीच दूध ओतलं नाही – गाभाऱ्यात दुधाचा थेंब देखील पडला नाही.

**राजा** : असं कसं ? मी स्वत: गाभाऱ्यात ओतायला गाडाभर हंडे पाठवले.

**प्रधान** : क्षमा असावी महाराज पण ते हंडे गाडीवानानं परस्पर बाजारामध्ये नेऊन विकले

**राजा** : (संतापून) काय ? राजवाड्यातलं दूध विकलं ? आणि इथं लोकांनी रिकामी भांडी आणली – शिपाई – शिपाई (शिपाई

येतो) लोक दूध आणतात की नाही बघायची आज्ञा तुला होती की नाही ?

**शिपाई :** होय सरकार – सगळे हंडे भरलेले होते.

**राजा :** वर खोटं बोलतोस ? ---नजी, याला फटके मारा, लाथांनी तुडवा, सुळी द्या.

**शिपाई :** क्षमा करा सरकार – क्षमा करा – (राजाच्या पायावर पडतो. त्याचबरोबर त्याच्याजवळचे बोचके सुटून खाली पडते. आतून निरनिराळ्या वस्तू खाली पडतात.)

**प्रधान :** आं ऽ ऽ हे काय ? कडी, सरी, अंगठ्या, रुपये – शिपाई हे आहे काय ?

**शिपाई :** हे – हे – सारं (रडकुंडीला आलेला) मी नको नको म्हणत असता मला सगळ्यांनी या वस्तू दिल्या – म्हणाले आमची भांडी उघडू नका !

**राजा :** म्हणजे त्यांनी तुला लाच दिली – तू खाल्लीस ! लाच खाणं हा गुन्हा आहे – ठाऊक नाही तुला ?

**शिपाई :** काय करू सरकार – मलाही पोरंबाळं आहेत !

**राजा :** म्हणून तू लाच खाल्लीस तू स्वतःच्या पोराबाळांचा विचार केलास – दूध वाचवताना प्रत्येकानं स्वतःच्या पोराबाळांचाच विचार केला ! पण चांडाळानो, अशानं गाभारा कोरडा राहिला – आता अवर्षण येईल ! मग तुम्ही आम्ही सगळेच मरून जाऊ तेव्हा पोराबाळांना कसे वाचवाल ?

**महादेव :** (प्रकट होऊन) राजा तू संधी घालवलीस. माझा गाभारा कोरडा राहिला – तो भरण्याची दानत तुझ्या एकाही नागरिकात नाही – आता अवर्षण टळत नाही – तुझा मुलूख बेचिराख झाल्याशिवाय राहात नाही.

**राजा :** थांबा महादेव – एकतरी संधी द्या – आणखी एक संधी –

**महादेव** : कशाला ? तुझा एक तरी नागरिक प्रामाणिक आहे ? एक तरी ? एक तरी – ? (लांबवर गणा, चंद्रा, शेठ, नोकर, शिपाई इ. सारे येऊन उभे राहिलेले )

**राजा** : एक तरी नागरिक प्रामाणिक आहे ? (ओरडून) बोला – एक जण तरी प्रामाणिक आहे – असे लांब उभे राहू नका – एकजण तरी पुढे या – म्हणा, मी प्रामाणिक आहे – मी खोटं बोलत नाही – मी लाच खात नाही. म्हणा, नाहीतर आपला देश दुष्काळांत जळून जाईल – कोणीच पुढे येत नाही देशाला वाचवायला कोणीच तयार नाही ? (महादेव देवळात जाऊ लागलेले. त्यांच्या मागे धावत जात) थांबा महादेवा एक संधी एकच संधी –

(महादेव गाभाऱ्यात जातो. त्याच्या मागून धावत, रडत, ओरडत राजा, त्याच्या मागून प्रधान आणि इकडे एका कोपऱ्यातून एक लहानसा मुलगा एक लहानशी लोटी घेऊन येतो.)

**शिपाई** : (पुढे येऊन) कोण आहे रे ? काय गडबड आहे ?

**मुलगा** : मी आहे सदाशिव, मला हे दूध गाभाऱ्यात नेऊन ओतायचं आहे.

**शिपाई** : चल हट् – रिकामी लोटी घेऊन आलास ना ? आणि वर खोटं बोलतोस ?

**सदाशिव** : रिकामी नाही हो – खरंच दूध आणलंय मी – पण एवढंसंच आहे. माझी आजी म्हातारी आहे – ती दुसरं काही खातपीत नाही तिला देऊन एवढंसंच उरलं. पण राजानं सांगितले म्हणून घेऊन आलो.

**शिपाई** : चावट कुठला ! कुणी सांगितलं तुला दूध आणायला ? तुझ्या एकट्याच्या दुधानं गाभारा थोडाच भरणार आहे ? जा – हो चालता –

**सदा.** : का रागावता उगाच माझ्यावर ? माझं काही चुकलं का ?

**शिपाई** : आणखी काय आणलंय्स तू ? पैसे, चीजवस्तू ? आण इकडं काय

असेल ते –

**सदा** : माझ्याजवळ काही नाही खरंच काही नाही. फक्त हे दूध –

**शिपाई** : लाज नाही वाटत असं बोलायला, म्हणे काही नाही. आण ते दूध. पिऊन टाकतो मीच.

**सदा.** : नाही नाही, मी नाही देणार.

(गाभाऱ्याच्या दिशेने पळू लागतो)

**शिपाई** : पकडा रे – पकडा त्याला. स्वतःला मोठा शहाणा समजतो –

(तशी इतका वेळ निश्चल उभी राहिलेली सगळी माणसे त्याच्या रोखाने पुढे येऊ लागतात)

**शेठ** : स्वतःला मोठा शहाणा समजतो. माझ्यासारख्या श्रीमंत शेठाला गाभाऱ्यात दूध ओतून टाकणं परवडत नाही आणि हा निघाला दूध ओतायला

**गणा** : हा निघाला दूध ओतायला, आमी जशी मानसं नव्हत – जनावरं !

**बंटी** : ह्यो एकटाच तेवढा मानूस !

**शेठ** : धरा रे – पकडा त्याला. गाभाऱ्यापर्यंत जाऊ देऊ नका.

**सगळे** : जाऊ देऊ नका.

**शेठ** : तो गेला तर आपली अब्रू जाईल.

**सगळे** : अब्रू जाईल.

**शेठ** : सगळेच त्याच्यासारखे प्रामाणिक होतील !

**सगळे** : प्रामाणिक होतील !

**शेठ** : मग आपल्याला कोण विचारणार !

**सगळे** : कोण विचारणार ?

**शेठ** : मग आपल्याला कोण विचारणार !

**सगळे** : : कोण विचारणार ?

**शेठ** : चला तर – धरा त्याला !

**सगळे** : धरा त्याला – पकडा त्याला !

(सगळे तुटून पडतात, सदाशिव पळण्याचा खूप प्रयत्न करतो. पण अखेरीस त्याचा नाइलाज होतो त्याच्याजवळची लोटी हिसकून घेण्याचा प्रयत्न करतात. तो ती गच्च धरून ठेवतो. हाणामारीत शिपायाचा हातातील भाला सदाशिवाच्या कपाळाला लागतो. रक्त वाहू लागते.)

सदा. : मला जाऊ द्या ! मला देवळात जाऊ द्या !

(अखेरीस हिसकाहिसकीत त्याच्या हातातील लोटी खाली पडते. दूध वाहू लागते. सगळे हर्षाने बाजूला होतात.)

(मुसमुसत) सांब सदाशिवा, तुलाच तुलाच सारं उमजेल !

(रडतरडत दूध लोटीत भरू लागतो. प्रधान देवळातून धावत येतो.)

प्रधान : चमत्कार ! चमत्कार झाला ! गाभारा आपोआप दुधाने भरायला लागला ! तू कोण रे बाळा – आणि हे काय करतोय्‌स ? दूध लोटीत भरतोय्‌स !

सदा. : माझं – माझं दूध – सांडलं !

महादेव : (नुसता आवाज) नाही बाळा. ते दूध सांडलं नाही. ते मला पोचलं. कुणालाही न घाबरता तू मनापासून माझ्यापाशी आलास – नाही – मीच तुझ्यापाशी आलो !

राजा : (धावत येऊन) उठ बाळा. अरे तुझ्यामुळे आमच्यावरचं संकट टळलं तूच आमचा आधार !

(आभाळात ढग दाटून येतात पाऊस पडू लागतो.) ❋ ❋



